# नवभारत

जानेवारी - २०१६



- मंगेश पाडगावकरांची कविता
- मालिक्कार्जुन मन्सूर : अभिजाततेचा परमोत्कर्ष
- सेवाग्रामातील ग्रामसेवा
- भारतीय कालपटाचा विल्यम जोन्सने घातलेला घोळ
- भारत पाकिस्तान संबंध (काही मिथ्या कल्पना व अर्धसत्य)
- जुने लेखन : संकेतगृहें
- खनिज स्रोतांकडून वनस्पतीज स्रोतांकडे
- वाचकांचा पत्रव्यवहार
  राज्यघटना घडवून नेमके काय साधले गेले



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९। अंक ४। जानेवारी २०१६
मार्गशीर्ष /पौष शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रूपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## जानेवारी २०१६

## अनुक्रमणिका

# मंगेश पाडगावकरांची कविता

माधवी देसाई

कधी कधी पहाटते उरी आगळी प्रतीती
जाळीमधून धुक्याच्या तेज झिरपते चित्तीं
जाचूं लागते जिप्सीला ज्ञान विश्वाची चौकट
आणि जाणवते कांही गूढ...अंधुक...पुसट!
खेळ मांडिलेला सारा पुन्हा उधळाया सजे
आपणच निर्मिलेलें आपणच मोड धजे
गूढ अज्ञात धुक्यांत आणि जातसे बुडून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनांत दडून.

'जिप्सी'

ही अज्ञाताची ओढ, गूढगुंजन मराठी कवितेला केशवसुतांपासूनच परिचित आहे. कविसापेक्ष त्याचा आविष्कार भिन्न आहे. ज्ञाताच्या प्रदेशाच्या पलीकडे जो अज्ञाताचा प्रदेश आहे त्याची ओढ केशवसुत, बालकवी आदींच्या कवितेतून व्यक्त झाली. त्याच अज्ञाताच्या गूढ धुक्यात हरवू पाहणारा 'जिप्सी' म्हणजे कवी मंगेश पाडगावकर. नवकविता, नवनवकविता आली, येत राहिली; पण ऱ्हासकालीन सौंदर्यवादी कवितेच्या परंपरेचा वारसा कोणताही अभिनिवेश न घेता पाडगावकरांनी जपला. प्रारंभी बोरकर आणि कुसुमाग्रजांच्या कवितेच्या प्रभावाखाली पाडगावकरांच्या कवितेने 'धारानृत्य' केले. 'धारानृत्या'त पाडगावकरांच्या कवितेचा पदन्यास उत्साही व वेगवान होता; कारण त्यात आत्मनिष्ठाही उदंड होती. त्यांचा तो पहिलाच कवितासंग्रह होता. त्यातील तरल रोमँटिक कवितेचे रूपसौंदर्य रसिकांनी बरोबर टिपले आणि तिचे जोरदार स्वागतही केले. हे रसिकांनी केलेले स्वागत पाडगावकरांच्या मधील कवीला निश्चितच बळ देणारे ठरले. त्यानंतर मात्र पाडगावकरांच्या काव्यजाणिवा अधिक सूक्ष्म आणि व्यापक होत गेल्या. भाषिक जाणीव, शब्दवैभव आणि अभिरूचिसंपन्न निक्षळ सौंदर्यदृष्टी तर त्यांच्या 'धारानृत्या'मधून दिसली होतीच. पण महाराष्ट्रभूमीला ज्या उच्च जीवनमूल्यांबद्दल उदंड आदर व प्रेम आहे त्या जीवनमूल्यांबद्दलही पाडगावकरांची कविता छान बोलत असल्याची नोंदही मराठी माणसाने मनोमन केलीच. त्यामुळे पाडगावकरांमधील कवी उत्साही होताच तो अधिक आनंदी झाला. अधिक सजग, जाणीव समृद्ध झाला. त्यांना रसिकांना, सर्वसामान्यांना काय हवे, काय आवडते याचा अंदाज आला. तरुणाईच्या मनातले तर त्यांना आधीच ज्ञात होते; त्यातच त्यांनी काव्यमयतेची आणखी समृद्धी वाढविली. त्यांनतर त्यांची कविता किरणांच्या कलाबुतीतून मोहरली, शुभ्र तुरे लेऊन आलेल्या आनंदी लाटांनी नटली, रानफुलांनी सजली. पारिजातगंध अधळू लागली, कळ्यातले देवदूत फुलवू लागली, निळे-सोनेरी गौरव दिशादिशातून उमलवू लागली. तिचे सारे सारे भय सरले आणि तिच्यातून ज्योतिर्मय झरे झरू लागले. त्यांच्या कवितागंधातून गूढ उकलू लागले. मातीत गाढ निजलेले बीज त्यांच्या कवितेला दिसू लागले. आषाढघन वाजू लागले की नवख्या चाहूली घेत त्यांची कविता श्रावणातली चित्रलिपी रेखाटू लागली. पाडगांवकरांच्या 'जिप्सी'ने रसिकांना कवितानंद दिला आणि समीक्षकांचेही लक्ष वेधले. बऱ्याच कालखंडानंतर एक नादमधुर, प्रासादिक, भावनाप्रधान, गूढ गुंजनात्मक रोमँटिक कवितेचा नजराणा रसिकांना मिळाला. त्यामुळे 'जिप्सी' हीच पाडगांवकरांची ओळख देणारा कवितासंग्रह ठरला. त्यानंतर पाडगावकरांनी उदंड कविता लिहिली.

पाडगांवकरांची कविता तरारून येणाऱ्या रोपाप्रमाणे कोवळी, हिरवी, तजेलदार होऊन बहरून लागली. उमलू लागली. माझी कविता इतर सर्वांपेक्षा आगळी वेगळी आहे, स्वतंत्र आहे, सर्वोत्कृष्ट आहे असा दावा, आग्रह त्यांनी धरला नाही. रोमँटिक कवितेची पताका आपसूकच त्यांच्या खांद्यावर आली होती. नवकवितेचा डंका वाजत असताना, दुर्बोध कवितेला भूषण म्हणून मिरविण्याचे ढोल बडविले जात असताना पाडगावकरांची कविता आपल्याच काव्यतंद्रीत 'सतार' छेडत होती. स्वरमंडलांप्रमाणे कर्णमधुर, भावमधुर, शब्दमधुर








आवर्तनातून निनादत डोलत होती. त्यांची कविता कधीच शब्दांचा 'दुर्घट घाट' चढली नाही व 'दुर्बोध'तेची वाट कधीच चालली नाही. सुगम काव्यात्म शब्द, स्वतःचे स्वतंत्र कल्पनाविश्व आणि मानवीभावभावना, संवेदना, जाणिवा अभिव्यक्त करीत राहिली. मनाच्या अगणित भावच्छटा पाडगावकरांनी कवितेतून मनोहारीरितीने मांडल्या. त्या मांडताना त्यांनी निसर्गातील सगळ्या चराचराला सगे-सोयरे-सांगाती केले. इतकेच नव्हे तर निसर्गाला आपला 'हमराज', 'हमराही' केले. त्यातून त्यांचे काव्यविश्व आकाराला आले. निसर्ग वगळला तर पाडगावकरांची कविता संपते. निसर्गातील रंगांचा पंखा उघडून, रंग-गंधाली घेऊन त्यांनी जी भावचित्रे रेखाटली ती अपूर्वच. निळा सोनेरी एकांत, निळे धुके, संथ निळे पाणी, निळी भुलावण, शुभ्र क्षण, फिकट पांढरी चंद्रकोर, लालकेशरी जाळ, केशर क्रांती, हिरवी झाडे, शामल डोंगर, निळसर तलम हवा, हिरवी तृणपाती, लाल मातीचा गुलाल, सोनेरी मुलामा, हंसशुभ्र निर्झरिणी, सोनेरी गिरकी, जास्वंदी लाल लाल फुले, कृष्णवसन, शुभ्र गुच्छ, केशरी अंजिरी रंगात न्हालेली मायाविनी, चंदेरी धुके, पिवळी रेशिमकांती, हिरवी हंबरे, एकटा काळा कडा, निळा वारा, साजरंगी फुलोरा, निळे चांदणे, पिवळे ऊन, हिरवे तळे, लाल कौलारे, निळी फांदी, काळी भोर नाव, हिरवे वळण, डोळ्यांची काळी भोर शीळ, हिरवा द्वेष, लाल गोड प्रकाश, लाल पिंजर, संथ पिवळे काठ, नितळ काळाप्रवाह, निळी गूढ हवा, निळा पूर्णविराम, फुलपाखरी उन्ह, टंच तांबडी वाट, निळे जांभळे पंख, कुसुंबी मोह, मंद गुलाबी घर, सुरंगी साज हे आणि असे अगणित रंग पाडगावकरांनी 'काव्य-रती'ला, 'काव्यसुंदरी'ला बहाल केले. पाडगावकरांची सौंदर्यदृष्टी, अनुभव घेण्याची आनंदीवृत्ती नेहमी अजर आणि निरोगी राहिली. लहान वा मोठे काहीही सुंदर दिसले की, त्यांची संवेदना उत्तेजित होऊन स्पंदने घ्यायची; तीच स्पंदने पाडगावकर कवितेत सुरेखपणे मांडायचे. अगदी छोटा इवला थेंब पडतानाचीही अनुभूती ते घ्यायचे आणि फुलून लिहायचे. फुलाच उमलणं डोळ्यांना दिसत नसूनही पाडगावकर कवितेतून अगदी फुलासारखे फुलले, उमलले. त्यांच्या कवितेचे रंग-नाद-गंध वेडेपण, तरलपण प्रेमात पडलेल्या तरुणाईला वेडे करून गेले. कॉलेजेमध्ये प्रवेश केलेल्या प्रत्येक तरुण-तरुणीला पाडगावकरांची कविता 'आपलीच कविता' वाटू लागली. बकुळीच्या झाडाखाली निळयाचांदण्यात हृदयाची ओळख पटलेली प्रेमीयुगुले सगळ्या बकुळफुलांच्या शपथा घालू लागली. जुईच्या शुभ्रफुलांचा चांद पाहात भुईचा उत्सव साजरा करू लागली. सोनिया उन्हात भुरभुरणाऱ्या पावसात हिरव्या गवतातून वाट चुकू लागली. आणि सुरंगी सांजेच्या उदास आभाळाची शपथ घालू लागली. पाडगावकरांनी तारुण्याच्या उंबरठ्यावरील 'टीन एजर्स'ची कविता लिहिली म्हणूनच त्यांच्या कवितेला म. द. हातकणंगलेकर 'ॲडोलेसंट रोमँटिसिझमची कविता' असे म्हणतात. त्यांच्या कवितेने प्रेमीजनांच्या प्रेमाला इंद्रधनुष्यी, फुलपंखी रंग दिले. गुलाबी प्रेमपत्रांना प्रणयी शब्दांची सुंदरता दिली. सळसळत्या तारुण्यसुलभ प्रीतीला बोलगाणी दिली. अबोल प्रीतीला बोलघेवड्या लाटांशी बोलायला शिकविले. भटक्या पक्ष्यांना कवितेचे उबदार घरटे दिले. रंग-नाद-गंधांचे उत्सव त्यांच्या कवितेने साजरे केले. त्यामुळे महाविद्यालयांच्या स्नेहसंमेलनात, कवितावाचनाच्या कार्यक्रमात पाडगावकरांची कविता हमखास टाळ्या मिळवू लागली. तरुणाईच्या डोळ्यांना प्रीतीची सोनेरी स्वप्ने देणारी त्यांची कविता मनामनात गुणगुणणाऱ्या प्रीतीची प्रतीती देणारी होती. 'प्रेम' या शब्दाला जो एक चोरटेपणाचा, आगसतेचा शेवाळलेला बुळबुळीतपणा आला होता त्याला पाडगावकरांच्या कवितेने पॉलिश करून चकाकी दिली. 'तुमचं आमचं सेम असतं' असे म्हणत त्यांनी प्रेमाच्या असंख्य छटा कवितेत रंगविल्या. त्यासाठी अगदी परिचित प्रतिमा वापरूनही त्यांची प्रतिमासृष्टी रंगबावरी, फुललेली, गंध नाद मधूर अशीच राहिली; हा त्यांच्या कवितेचा समृद्ध पैलू होता. गो. वि. करंदीकर म्हणतात, "काव्यात दुसरे काही असो किंवा नसो, निदान सच्ची प्रतिमासृष्टी तरी असलीच पाहिजे."

(१) त्याप्रमाणे पाडगावकरांच्या काव्यात निसर्गप्रतिमांचा सुंदर मेळा सजलेला होता. पाडगावकरांच्या कविता प्रेमिजनांचे भावबंध, विविध भाववृत्ती साक्षात करीत गेल्याने त्यांची कविता खूप लोकप्रिय झाली. वटलेल्या ओंडक्यालाही पालवी फोडण्याइतकी प्रेमाची तरल








उत्कटता, रसरसता तारुण्यभाव त्यांनी कवितेतून आविष्कृत केला. स्त्री-पुरुषांना/तरुण-तरुणींना वाटणारे प्रेमाचे आकर्षण हे मूलभूत अकृत्रिम, निसर्गदत्त सहजप्रवृत्ती आहे. यात पाप नाही, या विचारांवर तरुणाईला विश्वास ठेवावयास लावण्यामध्ये पाडगावकरांच्या कवितेचे यश आहे. तथाकथित संस्कृतिरक्षक सनातन्यांना त्यांनी ठणकावून सांगितले,

"तू प्रेम केलंस म्हणून
जगात या जगावसं वाटते मला
तू प्रेम केलंस म्हणून
माझं गाणं गावं असं वाटलं मला."

(बोलगाणी. पृ. ७)

आणि सतानन्यांना उलट प्रश्न विचारला,

"त्यानं प्रेम केलं
किंवा तिने प्रेम केलं
करू दे की! मला सांगा तुमचं काय गेलं?
तो तिला एकान्तात
बागेमध्ये भेटला
नको तितकं जवळ जाऊन
अंगाशी खेटला
लाल लाल गुलाबाचं
फूल होऊन पेटला?
भेटला तर भेटू दे की
पेटला तर पेटू दे की
तुमचं डोकं कशासाठी इतकं गरम
त्याने प्रेम केलं किंवा तिनं प्रेम केलं
करू दे की! मला सांगा तुमचं काय गेलं?"

(बोलगाणी पृ. १७)

असे सवाल करत असतानाच त्यांनी अगदी प्रांजळपणे सांगितले की,

"प्रेमाची हाक येते
तुम्ही धुंद साद देता
कवितेच्या ओळी ऐकून
मनापासून दाद देता
विश्वास ठेवा यात काही पाप नाही.
आनंदाने जगायचं नाकारणं
यांच्यासारखा आणि दुसरा शाप नाही."

(बोलगाणी पृ. ७१)

असे प्रेमाचे सूक्त गाणाऱ्या पाडगावकरांच्या कवितेने नंतर थोडे वळण बदलले. प्रेमाच्या घरट्यातून त्यांची कविता बाहेर पडून घराघरातून डोकावू लागली आणि म्हणाली,

"आता सारे बदलले
अहो जग पुढे गेले.
विसरा तो जुना घोष : रखुमाईवरा बापा
आता ओठाओठांवर : लारी लप्पा लारी लप्पा.
आता संस्कृती म्हणजे रेशमाचा बुशकोट
आता संस्कृती म्हणजे लाल रंगलेले ओठ
आता संस्कृती म्हणजे प्रचार नि जाहिरात
आता सारे बदलले, अहो जग पुढे गेले"

(जिप्सी. पृ. ८१)

असे म्हणत पाडगावकरांची अभिव्यक्ती अधिक डोळस होऊन तिची निरीक्षणशक्ती अधिक सूक्ष्म झाली. जीवनातील प्रेमाव्यतिरिक्त इतर भावही कवितेत आणू लागली.

कुणाकुणासाठी इथे
खांदा वहायचा क्रूस?
स्वत:च्याच बर्गडींत
विझे दिवाः रिती कूस
......................
पेंगताना कुंद वारे
तेवढीच उरे ओल
झाड प्रार्थनेसारखे
स्फुरे काळोखात खोल.

(उत्सव. पृ. ५७)

जीवनातील अन्य दुःखे नजरेसमोर साकार होऊ लागल्यावर पाडगावकरांच्या कवितेला, प्रार्थना स्फुरू लागली. समूहाचे, समाजातील विफल घटकाचे, वृद्धींचे दुःखही हळवे करू लागले. पाडगावकर लिहितात.

"येते भिजलेली कींव
जेव्हां दारी आसऱ्याला
.........................
दोन पाय...दोन डोळे
लोंबणारे दोन हात

........................
स्पंदणारा एक आत्मा
उभा खोल डोळ्यांमागे
याच्यासाठी झाली होती
त्याला खिळे ठोक मार्गे"

(उत्सव, पृ. ५८)

'उत्सव' नंतर पाडगावकरांची अभिव्यक्ती अंतर्मुख झाली. जीवनाचे खरे रूप न दिसता. त्याचा मुखवटा घेतलेला नाटकी, बेगडीपणा दिसला. साहजिकच त्यामुळे 'विदुषका'चा खरा चेहरा दिसला. दु:खाने घेतलेले सुखाचे, अश्रूंनी घेतलेले हास्याचे मुखवटे दिसले. 'विदूषक'च्या रूपाने पाडगावकरांची कविता गंभीर झाली पण, तिचा गंभीर व्यंग्यार्थपूर्ण, व्यापक आविष्कार पाडगावकरांच्या काव्यप्रतिमेला पेलणारा नव्हता; मग त्यांनी बोचकारणाऱ्या, ओरखडणाऱ्या, चिमटे काढणाऱ्या शैलीतून विदूषकाचा चेहरा वर्णन केला. प्रखर वास्तवाचा, आस्तित्वाचा शोध घेताना त्यांना काव्यमयता टिकविताना प्रयास पडू लागले. मग त्यांनी काव्यमयतेचा सोस आणि हव्यास सोडला आणि आपल्या आविष्काराचे स्वरूप रोखठोक केले. पण त्यामुळे त्यांची कविता गद्यमय झाली; तिच्यात आशयसौंदर्य विषयवैविध्य असूनही तिच्यातील काव्यात्मकता हरवली. मर्ढेकरांच्या कवितेने उपरोधाच्या, उपहासात्मक शस्त्राने ऱ्हासशील समाजाच्या मानसिक दौर्बल्यावर, बधीर-बोथट झालेल्या संबेदनशीलतेवर जसे कडवट घाव घालून व्यंगार्थपूर्ण, अस्सल, कालसापेक्ष तरीही कालनिरपेक्ष कविता लिहिली ती अभिव्यक्ती आणि प्रतिभेचे सामर्थ्य पाडगावकरांच्या उपरोधात नसले तरी पाडगावकरांनी मानवी मनातील अपक्षवृत्ती, कुजकट वृत्ती, भ्रष्ट समाज, गुंडगिरी, लाचखोरी, गुंड धनदांडगे पुढारी, सत्ता पिपासू यांच्याकडून थोर साहित्यिक, कलावंत यांची होणारी अवहेलना, अवमान इत्यादींवर आपल्या कवितेतून ओरखडे ओढले; उपहासाने बोचकारले. सर्वसामान्यांना नित्य अनुभवाला येणारी गुंडांची दहशत, सत्ताधारी राजकारण्यांकडून होणारी फसगत, मानवी भावनांचे पैसावसूल बाजारीकरण, शोषण आणि स्त्रीदेहाचा पाखंडी गोंडस लिलाव या आणि अशा गोष्टींवर पाडगावकरांनी आपल्या कवितेतून केलेला उपहास तोही बोचकरणाऱ्या विनोदी ढंगाने केलेला उपहास लोकांना आवडला. काही वेळा विनोद टाळून टोकेरी उपरोधानेही त्यांनी सामाजिक व्यंगावर, कोडग्या मनोवृत्तींवर आणि भ्रष्टाचाराच्या बजबजपुरीवर कविता केली. ते लिहितात,

"या माझ्या परमपवित्र इत्यादी देशाला सलाम
देशाच्या सुडदात्त सुमंगल सुपरंपरेला सलाम
सर्व बिलंदर घोषणांना सलाम,
जातिभेदाच्या उकिरड्यांना सलाम
या उकिरड्यातून पीक काढणाऱ्यांना सलाम.
.....................................
सत्तासंपत्तीच्या भडव्यांचा देश म्हटले
तर डोके फोडतील,
..........................
खरीदले जाणाऱ्यांचा देश म्हटले,
तर वाटा रोखतील,
......................
शोषण करणाऱ्यांचा देश म्हटले
तर नोकरीवरून काढतील
............
तर अनेक हात असते
तर अनेक हातांनी केला असता सलाम,
लेकिन माफ करना भाइयों,
हात तर दोनच
आणि त्यातला डावा
लाथेच्या भयाने
ठेवलेला गांडीवर
म्हणून फक्त
उजव्या हाताने सलाम,"

सलाम पृ. ३, ४

"बाजूच्या अलिशान इमारतींना जाचणारा
गटारनाला वाऱ्यावर वाहणारा वाईट वास,
काठावरच्या झोपडपट्टीतली अचकट विचकट
माणसे, हिडीस प्रदर्शने, शिव्या, मारामाऱ्या...
गटारनाल्यात न्हाणारे नागवे पोर
डुबक्यांवर डुबक्या घेत मजेत हासत....
....मी रस्त्याने जाताना बघतो सांस्कृतिक शहारून

अनुक्रमणिका






तेव्हा माझ्या मनगटावरल्या शॉकप्रुफ घड्याळात
असतात वाजलेले पावणेआठ.
समस्त मानवांच्या घड्याळांत पावणे आठ."
सलाम पृ. १०.

सर्वसामान्यांची राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक क्षेत्राशी संबंधित असलेली दुखरी नस पाडगावकरांच्या सूक्ष्म निरीक्षणाने ओळखली होती. त्याचबरोबर तथाकथित संस्कृति जपणाऱ्यांचा सामाजिक बांधीलकीला. कर्तव्याला बगल देणाचा सोयीस्कर. वक्तशीर कर्तव्याचा आव आणि दिखाऊपणाही त्यांनी कवितेतून मांडला. हे सर्व पाडगांवकरांनी आपल्या कवितेतून स्पष्टपणे सर्वसामान्यांच्याच भाषेतून व्यक्त केल्याने पाडगावकरांच्या या आणि अशाही कविता उदंड लोकप्रिय झाल्या. 'उदासबोध' या विडंबन काव्यात तर पाडगांवकरांची उपहासशैली विनोदांच्या अंगाने बोचकारणारी होती. करवतीवर किनखाब चढवावा तसे या कवितांचे स्वरूप आहे. पाडगावकर लिहितात,

"आज हयात असते रामदास
तर भोवती बघून हरामदास
अंतरी जाले असते उदास
लागोन चिंता."
(उदासबोध पृ. १)

ओं नमो जी गजानना
येकदंता त्रिनयना
कृपादृष्टीने खुर्चीस्तवना
यश द्यावे
.......
खुर्ची असता बुडाखाली
पंडित गर्दभाची करी हमाली,
खुर्ची नसता बुडाखाली
हमालही पुसेना.
.......
खुर्चीसाठी आणावे लष्कर
खुर्चीसाठी पोसावे तस्कर.
खुर्चीस्वामिनी, आपण किंकर
तात्पर्य : खुर्ची सोडू नये
सत्य : खुर्ची सोडू नये
धन्यवाद खुर्ची सोडू नये
बुडाखालची."
(उदासबोध पृ. ७)

'उदासबोध' मधील या कवितेप्रमाणेच प्रज्ञालक्षण, नेतृत्वलक्षण, भाषणकला, प्रचारविद्यास्तुती, व्यापारश्रेष्ठीविक्रयकला, सहकारसारनिरूपण, निवडणुकशास्त्र, शहाणपणनिरूपण, मूर्खलक्षण, सत्यमेवजयते, बुळेपणशक्तियोग, मेंढरायण इत्यादी. कविताही खूप गाजल्या. सामाजिक जाणीवांचा बोथटपणा संवेदनशील मनाला अस्वस्थ करून गेला. समाजातील सर्व मतलबी, निष्ठूर, क्रूर, पाखंडी, गुंड, निष्क्रीय राजकारणी आणि त्यात भरडणारी, भयाकुल, अगतिक झालेली जनता या आणि अशा सर्व विषारी, शोषक, विदारक अपप्रवृत्तींना पाडगावकरांनी विडंबनकाव्यात शब्दबद्ध केले. त्यातून त्यांची सूक्ष्म निरीक्षणशक्ती, तीव्र संवेदलशीलता प्रत्ययाला येते. पण या दुरवस्थेच्या वर्णानानंतर पाडगावकर हताश होऊन लिहितात,

"जगाला सुधारायचं घेऊन ओझं खांद्यावर
तोंडात फेस जमेपर्यंत धावत सुटणं
आता मी अगदी पुरतं थांबवलंय :
थांबवलंय असं म्हणण्यापेक्षा ते
आपोआप थांलंय हेच अगदी खरं !
शब्द. पृ. १४

"नव्या नव्या आकर्षक घोषणांचे कारखानदार
जुनेच शब्द नव्याने पॉलिश करून तयार झाले"!
शब्द. पृ. १५

"शब्द जेव्हा संपूर्ण पुसून टाकता येतात
त्याचक्षणी आयुष्याचा अर्थ कळतो!"
शब्द पृ. ८६.

अशी विडंबन कविता लोकप्रिय झाली. पण ती खूपच गद्य बोली बोलू लागली. काही वेळा तर चक्कं चंद्रकांत पाटलाच्या भाषेत सांगायचे तर 'बडबडू लागली.'

पाडगावकरांची कविता अशी वळणे घेत राहिली. तिने बालकवितेचेही वळण घेतले. एकूणच अबालबृद्धांच्या कविता, गाणी पाडगावकरांनी लिहिली. 'त्रिवेणी'सारखा संध्याकाळचे गझल, न-गझल, न-गझल, बोलगझल– कवितासंग्रह (संकीर्ण विषयावरील कविता) रसिकांना

आवडला. जीवनगाणे गाणारे पाडगावकर जीवनासह मृत्यूचेही गाणे गाऊ लागले. 'आपुला तारा खुणावे' कवितेत ते म्हणतात,

"शाहण्याने आपुले थडगे खणावे
आणि खणताना पुन्हा गाणे म्हणावे."

त्रिवेणी पृ. १३

असे जीवनमृत्यू बद्दल बोलताना पाडगावकरांना 'भाषे'चाही विसर पडला नव्हता.

"भाषेला वणवा होऊन पेटताना पाहिली,
.....
वांझोट्या विद्वत्तेच्या फांदीवरती बसून
भाषेला कावळ्यासारखी शिटताना पाहिली;"

त्रिवेणी पृ. ८३

असे विषयवैविध्य त्यांच्या कवितेत अवतरले ही विषयांच्या बाबतीतील जमेची बाजू. असंख्य विषय काव्यबद्ध केल्यानंतर एका वळणावर पाडगावकरांची नजर पैलतीराकडे गेली. 'सूर आनंदघन' मधील काही कविता याची साक्ष देतात,

"नाही उरली प्यास रे!
जन्ममरण लंघुन राहिला
नित्यानिरंजन ध्यास रे
.....
नाही येणे, नाही जाणे
सरला सर्व प्रवास रे
......
भोगही नाही त्यागही नाही
हा अनवट संन्यास रे"

सूर आनंदघन पृ. २१

'प्यास उरली नाही रे' असे सांगत पाडगावकरांची कविता 'आत्मरूप ओंकार' करताना म्हणते,

"आत्मरूप ओंकार!
जागृत झाल्या सचेतनाचा
हा सुंदर हुंकार,
.....
गगन व्यापूनि बरसे बरसे
हाच आदिमल्हार
अरूप घेई रूप इथे अन्
निराकार ओंकार."

सूर आनंदघन पृ. २०

असा पाडगावकरांच्या कवितेचा स्थूलमानाने वळणावळणाचा प्रवास असला तरी त्यातून त्यांच्या अभिव्यक्तीचे, आविष्काराचे स्वरूप त्यांची कविताच विशद करते. पाडगावकरांच्या प्रेमकविता आणि निसर्गकविता या एकमेकींच्या हातात हात घालून चालतात. त्यातील स्वप्नमय, काव्यमय वर्णनामुळे त्यांची कविता लोकप्रिय झाली. आध्यात्मिक शोधाच्या वाटेवर गेलेल्या पाडगावकरांनी तो शोध ही अपूर्णच अर्ध्यावर सोडला आणि उपहासात्मक कवितेच्या वाटेवर चालू लागले. कारण आपली लोकप्रियता टिकवून ठेवण्याचा ते जाणीवपूर्वक विडंबणात्मक प्रयास, अट्टाहास करीत होते. पण उपहासात्मक कवितेतही त्यांच्या अभिव्यक्तीचा दर्जा अगदीच ... घसरून सुमार झाला.

"भलतीच टेनिसपटू एक होती बाई,
.....
अजून ती बाई कधी हरली नाही."

वात्रटिका पृ. ६४

"एक होती खारीक,
तिची कंबर भली बारीक;
राहिना ती कह्यात
जेव्हा आली वयात,
मला मात्र आठवेना तेव्हाची ती तारीख!"

वात्रटिका पृ. १०७

"एक होती नटी,
तिची सिंहासारखी कटी!
......
पण तिच्या दाराला होत्या अनेक फटी!!"

वात्रटिका पृ. १२६

"एक होती मुंगी
तिने गाठली लुंगी
.......
आणि बाहेर येताच तिला आली गुंगी"

वात्रटिका पृ. १४४

"अहो प्लीज भाषण आवरा
धोतर जागेवरती नाही









मुख्य मुद्दा आधी सावरा!"

वात्रटिका पृ. १६५

यासारख्या वात्रटिकांचा दर्जा अगदीच घसरलेला आहे. स्त्रीदेह हा अशादृष्टीने वात्रटिकांचा विषय व्हावा यात कवित्व किती आणि कोणते? पाडगावकरांच्या कवितेविषयी बाकीबाब (बा. भ. बोरकर) म्हणतात, "पाडगावकरसुद्धा 'जिप्सी'तलेच खरे. 'जिप्सी' ही त्यांची कविता अपूर्व. त्यांनी नंतर 'वात्रटिका' लिहिल्या, 'विदूषक' लिहिलं; पण त्यात त्यांनी आपला स्वभाव सोडलाच. त्यात खरे पाडगावकर नाहीत. मुंबईला त्यांनी मला वात्रटिका वाचून दाखविल्यावर 'कशा आहेत?' असं मला विचारलं. मी टीका केल्यावर त्यांना ती आवडली नाही. टीका करणं सोपं, लिहिणं कठीण" असं ते म्हणाले मी त्या वेळी गप्प राहिलो. त्यानंतर ते अंघोळीला गेले. बाथरूममधून टॉवेल गुंडाळून बाहेर आलेले दिसल्यावर मी चटकन म्हटलं,

'एवढासा टॉवेल
त्यात कसं मावेल?'

हे ऐकल्यावर त्यांची मुलं, यशोदा वगैरे सगळी खो-खो हसू लागली आणि वात्रटिका लिहिणं किती सोपं आहे, याची त्यांना खात्री पटली." पाडगावकरांच्या 'वात्रटिकां'चा कवितेत समावेश करावा याविषयी साशंकता उत्पन्न होणे साहजिकच आहे. तो एका त्यांचा रचनाप्रयोग होता. भोलानाथ, बबलगम, चांदोमामा हे त्यांचे बालगीत संग्रह. पाडगावकरांची बालगीते मात्र बाळगोपाळांनाच नव्हे तर प्रौढवर्गालाही भावली. पाडगावकरांनी जाहिरातींसाठीही कविता लिहिली. पुणे विद्यापीठ म्हणजे सावित्रीबाई फुले विद्यापीठ, पुणे आणि आरोग्यविज्ञान विद्यापीठ, नाशिक या दोन विद्यापीठगीतांचं लेखन त्यांनी केले आहे.

पाडगावकरांच्या कवितेने जी प्रेमकविता आणि निसर्गकविता लिहिली तिच्यात विविध नवनवीन भाववृत्ती, असंख्य भावसंवेदना शब्दांनी सजवून आविष्कृत केल्या. त्यांची कविता नितळ झऱ्याप्रमाणे तळ दर्शविणारी होती. तिला दुबौधतेचा दुस्वास आणि काव्यमयतेचा हव्यास होता. त्यांची कविता लोकप्रिय आणि रसिकरंजनी होती. तिचा परीघ मर्यादित पण लोभस होता. लोकप्रियतेच्या, रसिकांच्या टाळ्यांच्या अनावर मोहामुळे त्यांची कविता सत्त्व आणि तत्त्व हरवून बसली. 'प्रेमकविता लिहिणारे पाडगांवकर' एवढीच आपल्यातील कवीची ओळख असू नये म्हणून त्यांनी औपरोधिक शैलीतून मर्ढेकरी वळणाची कविता लिहिण्याचा प्रयत्न केला; पण त्यातून त्यांना ऱ्हासशील मानवी जीवनाचा वेध घेण्यात यश आले नाही. 'विदूषक' मध्ये त्यांच्या मर्ढेकरी वळणाच्या कविता आहेतही. पण त्यात सातत्य राखणे पाडगावकरांना शक्य झाले नाही. अभिजातता आणि प्रतिभा असूनही पाडगावकर लोकप्रियतेच्या लाटेत बुडून गेले. त्यांची कविता मर्ढेकरांच्या कवितेसारखी अभिजात, अस्सल, सार्वकालिक झाली नाही. त्यांची कविता काव्याकडे कमी आणि गीताकडे अधिक झुकणारी असल्याने त्यांच्या कवितेची गाणी झाली व ती लोकप्रिय झाली. किंबहुना आजची लोकप्रिय कविता पाडगावकरांच्या कवितेला आदर्श मानून लिहिली जाते. त्यांच्या कवितांना संगीत बद्ध करून त्या नामवंत गायक-गायिकांनी गायल्यामुळे घराघरात पोचल्या. मंगेश पाडगावकर-अरूण दाते-यशवंत देव यांचा शब्द-स्वर-संगीत यांच्या त्रिवेणी संगमाने कविताप्रेमी, संगीतप्रेमींचे मन आणि कान तृप्त केले.

"एक क्षण असतो बहरण्याचा
आणि एक तुटून जाण्याचा
एक क्षण असतो असण्याचा
आणि असून नसण्याचा."

असे म्हणत 'असणे' आणि 'नसणे' या दोन बिंदूंच्या दरम्यान पाडगावकरांनी जीवनाचे सगळे रंग आणि आयाम शोधण्याचा प्रयत्न केला, त्याचवेळी आपल्या परमप्रिय सखीला मात्र स्पष्टच सांगितले,

"माग हवें तें गडे तू
माझे पंख मागू नको
रेशमी झुळझुळ धुंद निर्झराच्या काठी
इथे मखमली एकांत तुझ्यासाठी, तुझ्यासाठी
जरी तुझाच निर्झर.....
त्याची गती मागू नको
तुझ्या आलिंगनातच जग विसरून जावें
मन निशिगंधापरी मिठींतच उमलावें
सुगंधाच्यासाठीं पण

विकास तू मागू नको
माझे पंख मागू नको."

आता हे पंख कायमचे मिटले आहेत.

**संदर्भ :**

१) करंदीकर गो. वि. - परंपरा आणि नवता, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती, १९८०, पृष्ठ १०७.

२) वडेर प्रल्हाद - आशय आणि आविष्कार, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पहिली आवृत्ती, १९८८, पृष्ठ ८४.

❀❀❀

# मल्लिकार्जुन मन्सूर – अभिजाततेचा परमोत्कर्ष

गणेश उमाकांत थिटे

विसाव्या शतकातील एक महत्त्वाचे गायक मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांच्या गायकीसंबंधी चर्चा करणे हा प्रस्तुत निबंधाचा विषय आहे. ह्या निमित्ताने अभिजातता म्हणजे काय आणि शास्त्रीय संगीताच्या क्षेत्रात मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांनी अभिजाततेचा परमोत्कर्ष कसा साधला, ह्या विषयांची चर्चा करणेही अभिप्रेत आहे. मात्र त्यांच्या वैयक्तिक जीवनचरित्राचा परिचय करून देणे येथे अभिप्रेत नाही. १९११–१९९२ हा त्यांच्या जीवनाचा कालखंड आणि धारवाड येथे त्यांचा निवास होता, एवढी प्राथमिक माहिती येथे देत आहे; कारण ह्या स्थल-कालविषयक तपशिलांचा त्यांच्या अभिजाततेशी घनिष्ठ संबंध आहे.

प्रथम अभिजातता म्हणजे काय, ते पाहू. Classical ह्या शब्दाचा पर्याय म्हणून अभिजात हा शब्द मराठीत रूढ आहे. गेल्या काही (दोन-तीन) वर्षांत मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा ह्या दृष्टीने केल्या गेलेल्या प्रयत्नांच्या संदर्भात हा शब्द नव्याने पुनः उल्लेखिला गेला. मात्र अभिजात ही कल्पना किंवा त्या शब्दाची व्याख्या ह्यांविषयी चर्चा होत नाहीसे दिसते. मराठीच्या अभिजातत्वाची चर्चा हा विषय येथे जरी प्रस्तुत नसला, तरी मराठी ही अभिजात भाषा आहे असे म्हणणाऱ्यांनी जमवलेले पुरावे तिचे प्राचीनत्त्व सिद्ध करणारे आहेत, असे दिसते. सध्या भारतातील काही आधुनिक, जिवंत भाषांनाही अभिजात हा दर्जा मिळाला आहे, तो त्या भाषा प्राचीन आहेत ह्या आधारावरच आणि त्याच आधारे मराठी भाषेलाही अभिजाततेचा दर्जा मिळावा, असा प्रयत्न दिसतो. मात्र अशा विषयांचे अनुकूल-प्रतिकूल निर्णय राजकीय आणि आर्थिक फायद्यातोट्यांशी संबंधित विचारांवर आधारलेले असल्यामुळे केवळ शास्त्रीय चर्चेत तो विषय संपूर्णतः अप्रस्तुत ठरतो. हे विषयांतर आणखी एक मुद्दा सांगून संपवतो– संस्कृत ही भाषा खरे म्हणजे आजवर कित्येक वर्षे अभिजात मानली जात होती. पण सध्याचे संस्कृतप्रचारक संस्कृतच्या संदर्भात ती अभिजात भाषा नसून ती आजची, प्रचलित, जिवंत भाषा आहे; मराठी, हिंदी, इंग्रजी, जर्मन, फ्रेंच यांसारखीच ती एक बोलीभाषा आहे, हे दाखवण्याचा प्रयत्न करीत असतात. पुनः राजकीय आणि आर्थिक लाभ हेच त्यामागचे प्रयोजन असते, हे उघडच आहे.

माझ्या मते अभिजात, घरंदाज, कुलीन उच्चवर्णीय, classical हे शब्द प्रायः पर्यायवाचक आहेत. ज्या ललितकलांना अभिजात असे म्हटले जाते, त्या कलांचा उपयोग करणारा कलावंतवर्ग आणि त्यांचा आस्वाद घेणारा रसिकवर्ग दोन्हीही "नागरक" असतात. म्हणजे शब्दशः मोठ्या शहरातील, सुखवस्तु, धनिक, सुशिक्षित, प्रत्यक्ष शेतीमालाचे किंवा कारखान्यातील वस्तूंचे उत्पादन न करता त्या उत्पादनाशी दुरून संबंधित अशी व्यापार, करसंकलनादी कामे किंवा लेखन-वाचन-अध्ययन-अध्यापन अशी कामे करणारे किंवा वडिलोपर्जित धनाचा किंवा आपल्या पूर्वायुष्यातील नोकरीतून मिळणारी पोटगी (पेन्शन) ह्यांवर जगणारे असतात. भरपूर रिकामटेकडा वेळ असल्यामुळे ह्यांपैकी काही मंडळी आळस, गप्पा, विनोद, हास्यक्लब, सहली ह्यांत वेळ घालवत असतात; तर काही नाटक, चित्रपट, गायन, वादन, नृत्य, साहित्यचर्चा, इतिहाससंशोधन, तत्त्वज्ञानविषयक वादविवाद आणि ह्या विषयांच्या संदर्भातील अधिकाधिक खोल, सूक्ष्म, काथ्याकूट, hair-splithing ह्या प्रकारे कलानिर्मिती किंवा कलास्वाद घेण्यात रमत असतात. अभिजात संस्कृत साहित्याचा इतिहास लिहिणाऱ्या एस. के. दे ह्यांसारख्या लेखकांनी संस्कृतसाहित्य ज्या वातावरणात, सामाजिक परिस्थितीत निर्माण झाले, बहरले आणि नंतर अधःपतनाच्या अवस्थेत पोचले, त्या सर्वांविषयी प्रायः वरील प्रकारचेच विवेचन केले आहे; आणि त्याच संदर्भात कालिदासादी कवींचे रसग्रहण आणि मूल्यमापन केले आहे.

मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांच्या गायनासंदर्भात हे सर्व

अनुक्रमणिका






विवेचन अप्रत्यक्ष रीतीने उपयोगीच आहे. वयाच्या सहासष्ट-सदुसष्ट वर्षांपर्यंत त्यांचा श्रोतृवर्ग, रसिकवर्ग मुंबईसारख्या महानगरापुरताच मर्यादित होता. त्यांचे जाहीर कार्यक्रम जे काही थोडेसे होत, ते मुंबईतच (साधारणपणे १९७६ पर्यंत). कारण मुंबईसारख्या महानगरात सर्वच प्रकारचे श्रोते असल्याने मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचेही श्रोते होते. तोपर्यंत पुणेसुद्धा तुलनेने लहान शहर असल्याने त्यांचे पुण्यात फारसे कार्यक्रम होतच नसत. आकाशवाणीवरही मुंबई केंद्रात आणि दिल्लीहून प्रसिद्ध होणाऱ्या राष्ट्रीय संगीत कार्यक्रमात, तसेच आकाशवाणी संगीत संमेलनामध्ये मात्र त्यांचे कार्यक्रम नियमितपणे होत असत. त्यामुळे त्यांच्या कार्यक्रमांच्या श्रवणाच्या बाबतीत मी उत्सुक असूनही प्रत्यक्ष समोर बसून कार्यक्रम ऐकला, अशी परिस्थिती फार दुर्मीळ होती. शेवटी एकदा मी केवळ त्यांच्या कार्यक्रमासाठी पुण्याहून मुंबईला (गोरेगाव ह्या उपनगरात) जाऊन मगच कार्यक्रम ऐकू शकलो. ही १९७४ सालची गोष्ट आहे. तत्पूर्वी अगदी त्रोटक स्वरूपात मी समक्ष दोन-तीन कार्यक्रम ऐकले होते. १९७६ साली मात्र एक महत्त्वाची गोष्ट झाली. ती म्हणजे सुप्रसिद्ध मराठी लेखक पु. ल. देशपांडे ह्यांनी मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे तीन कार्यक्रम सलग दोन दिवसांसाठी आयोजित केले होते. पहिल्या दिवशीच्या कार्यक्रमात रात्री, दुसऱ्या दिवशी सकाळी, आणि सायंकाळी असे ते तीन कार्यक्रम झाले. त्यामुळे सुमारे दीड दिवसांत सुमारे १५-१६ राग ऐकता आले. पण ह्या कार्यक्रमांचा दुसरा एक अप्रत्यक्ष  लाभ मल्लिकार्जुन मन्सूर आणि माझ्यासारखे काही श्रोते ह्यांना झाला. तो असा की, मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांना पुण्यात प्रसिद्धी मिळाली आणि त्यांचे कार्यक्रम होऊ लागले. खरे म्हणजे संगीतविषयक अभिरुचीच्या इतिहासाच्या दृष्टीने प्रस्तुत गोष्ट अतिशय मर्मसूचक आहे. मल्लिकार्जुन मन्सूर हे श्रेष्ठ गायक होते ही गोष्ट खरी असली, ती गोष्ट पु. ल. देशपांडे ह्यांच्यासारख्या अन्य दृष्टीने प्रसिद्ध असलेल्या व्यक्तीकडून सांगण्यात आल्यावर लोकांना पटते, हा मुद्दा लोकांच्या संगीताभिरुचीचा इतिहास ह्या दृष्टीने लक्षणीय आहे. श्रोते स्वतंत्रपणे मूल्यमापन करू शकत नाहीत, असा त्याचा तात्पर्यार्थ दिसतो (म्हणजे ते प्रायः परप्रत्ययनेपवृद्धी असतात.)

मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे पहिले शिक्षण ग्वाल्हेर घराण्याचे गायक नीलकंठबुवा ह्यांच्याकडे झाले. पुढे काही काळ अल्लादियाखान ह्यांचा मुलगा मंजीखान ह्यांच्याकडे त्यांचे शिक्षण झाले. इथे अल्लादियाखान ह्यांच्याविषयी आणि त्यांच्या गायकीविषयी थोडेसे लिहिले पाहिजे. अल्लादियाखान हे जयपूर घराण्याचे प्रवर्तक मानले जातात. ते पूर्वी उत्तरभारतात होते, तरी नंतर ते कोल्हापूर येथील राजगायक झाले. ते मूळचे ध्रुपदगायक होते; पण नंतर ख्यालगायक बनले. गोविंदराव टेंबे ह्यांनी त्यांना संगीतातील गौरीशंकर अशी पदवी दिली आणि श्रेष्ठता बहाल केली. प्रथम त्यांच्या गाण्यात तानक्रियेचे महत्त्व अधिक होते; पण नंतर ते आलापी आणि ताना ह्यांचा समप्रमाणात उपयोग करू लागले. त्यांच्याजवळ मोठा रागसंग्रह होता आणि ते एक विद्वान गायक होते. पण त्यांचा भर अपरिचित (अनवट) राग गाण्यावर असे. जयपूर घराण्यातील त्यांच्या विद्यार्थी असलेल्या दोन प्रमुख गायिका म्हणजे केसरबाई केरकर आणि मोगूबाई कुर्डीकर. त्यांच्या अन्य काही विद्यार्थ्यांमध्ये भास्करबुवा बखले, त्यांचे दोन मुलगे मंजीखान आणि भुर्जीखान तुलनेने अल्पवयातच गेले. त्यामुळे शिष्यांच्या मृत्यूचा गुरूला शोक करावा आणि आवरावा लागला. पण ते खऱ्या अर्थाने गुरू होते. शिष्याला कितीही शिकवले, तरी ज्याची विद्या संपत नाही आणि विद्यार्थ्यांना शिकवता शिकवता स्वतःही शिकत राहून विद्यार्थ्यांना जो कधीही आपल्या बरोबरीला येऊ देत नाही, तो खरा श्रेष्ठ गुरू. ह्या अर्थाने ते श्रेष्ठ गुरू होते. कोल्हापूरला असताना विद्यार्थांना शिकताना जी  तान रात्री नाटकाला जाणारे लोक ऐकत असत, तीच तान ते नाटकाहून परत येत असतानाही विद्यार्थ्यांकडून तयार करून घेताना ऐकू येई, असे गोविंदरावांनी म्हटले आहे. ह्यावरून त्यांच्या अध्ययन-अध्यापनपद्धतीची कल्पना येते. दहा बारा वर्षे केसरबाई केरकर ह्यांना शिकवूनही "अजूनही तू माझ्याकडून काहीच शिकली नाहीस", असे म्हणणारे अल्लादियाखान किती विद्वान असतील, ह्याची कल्पना येते. तसेच एकच राग चार विद्यार्थ्यांना चार पद्धतींनी शिकवून पाचवे रूप पुनः स्वतःजवळ ठेवणारा गुरू

अनुक्रमणिका








किती सामर्थ्यवान असला पाहिजे, ह्याचा अंदाज येतो. असे हे अल्लादियाखान जयपूर घराण्याचे प्रवर्तक मानले जातात. त्यांचे सुपुत्र मंजीखान ह्यांच्याकडे मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे शिक्षण झाले. जयपूर घराण्याचे वैशिष्ट्यपूर्ण असे अनेक जोडराग मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांना शिकायला मिळले. वारंवार गाऊन, सतत रियाझ करून त्यांनी गायन ताजेतवाने ठेवले. त्यांतले प्रमुख राग पुढीलप्रमाणे –खट, खटतोडी, शिवमतभैरव, कबीरभैरव, जौन्तुरी, बहादुरी तोडी, शकुबिलावल, सामंतसारंग, मुलतानी अंगाचा धनाश्री, जैताश्री, धवलाश्री, मालाश्री, जैतकल्याण, वसंती केदार, वसंतीकानडा, नंद, नायकी कानडा, काफी कानडा, रायसा कानडा, सुघराई, सुहासुघराई, मीरा मल्हार, कौंसी कानडा, गोडमल्हार, मालवी, भूपन्ट, नटकामोद हेमनट, नटबिहाग, बिहागडा, सावनीकल्याण, सावनीनट, खाकर असे काही राग खास जयपुरी शैलीत मल्लिकार्जुन मन्सूर गात असत. ह्याशिवाय, मिया की तोडी, भीमपलास, यमनकल्याण, अडंबरी केदार, पूरीया, रामदासी मल्हार ह्यांसारखे रागही ते कधी कधी गात.

मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांच्या गाण्याची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे सांगता येतील– त्यांचे गाणे तालप्रधान होते. प्रायः मध्यलयीतच त्यांचे गाणे होई. इतर गायकांप्रमाणे ते अस्ताई करीत नसत. चटकन समेवर येऊन विविध प्रकारच्या तानांशी चाललेल्या खेळातून रागविस्तार होई. आलापी तुलनेने कमी, पण तानांवरच अधिक भर असे. अन्य घराण्यांमध्ये ज्याप्रमाणे गायक क्रमाक्रमाने वरचा स्वर लावत बऱ्याच वेळाने तारषड्ज लावतात, नंतर त्या स्वराच्या वरचेही स्वर घेत असतात त्याप्रमाणे न करता, ते लवकरच तारसप्तकातील एक षड्ज लावीत. गायन प्रायः मध्यसप्तकातच चाले. अतिमंद्र सप्तकापर्यंत किंवा अतितारसप्तकापर्यंत रागविस्तार करणे ह्याप्रकारे ते गायन करीत नसत. त्यांच्या गायनात ते सरगम करीत नसतं. तराणा हा गानप्रकार ते गात नसत. इतर गायक ज्याप्रमाणे एक विलंबित लयीतील आणि एक द्रुतलयीतील असे दोन ख्याल कोणत्याही रागाचे गातात, तसे ते दोन ख्याल न गाता एका रागाचा एकच ख्याल ते गात असत. ठुमरी, भजन, नाट्यगीत ह्यांसारखे अन्य गानप्रकारही ते प्रायः वर्ज्यच मानत. ह्याला अपवाद म्हणून क्वचित "दे हाता शरणागत' हे मूळ कानडी चालीवर आधारलेले नाट्यगीत किंवा संत मीराबाई ह्यांचे "जोगी मत, मत जा" हे गाणे क्वचित होत असे. त्यांच्या तरुणपणी त्यांनी "ही रात सवत बाई" हे भावगीतही गायल्याची आठवण काही वयस्कर श्रोते सांगत असत. परंतु पुढे पुढे त्यांनी हे सर्व लोकप्रिय गानप्रकार पूर्णपणे बंद केले. मला स्वतः ह्या प्रकारची गाणी ऐकण्याची संधी फारच क्वचित मिळाली. मात्र वर उल्लेखिलेले राग ऐकण्याची संधी मात्र अनेकदा मिळाली.

ह्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, लोकप्रियता मिळवण्यासाठी, कार्यक्रम मिळवण्यासाठी ज्या काही तडजोडी कराव्या लागतात, उच्च प्रतीचे पण रूक्ष गायन न करता श्रोत्यांना आवडेल. कळेल असे गाण्याचा प्रयत्न मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांनी कधीच केला नाही. त्यांना जे गावयाचे तेच ते गात राहिले, त्यामुळे त्यांचे व्यावसायिक किंवा धंदा म्हणून यश मर्यादितच राहिले. वयाच्या सत्तरीपर्यंत ते रेल्वेच्या द्वितीय (त्याआधी तृतीय श्रेणीत) प्रवास करीत राहिले. त्यांना विमानप्रवास परवडला असता, असे वाटत नाही. ते परदेशात कधी गेले नाहीत. परदेशात नाव मिळवल्यामुळे मिळणारी प्रसिद्धी, लोकप्रियता हीही त्यांना मिळाली नाही. त्यांच्या वयाच्या पासष्ट वर्षांपर्यंत त्यांच्या सार्वजनिक कार्यक्रमांची, तिकिट लावून होणाऱ्या कार्यक्रमांची संख्या मर्यादितच राहिली. १९७६ मध्ये त्यांचे तीन सलग कार्यक्रम पुण्यात (रात्री, सकाळी, सायंकाळी) मराठीतील प्रसिद्ध, सर्वमान्य साहित्यिक आणि विनोदी लेखक पु. ल. देशपांडे ह्यांनी स्वतः आयोजित केले होते. त्यांनीच त्यांच्यावर "गाण्यात राहणारा मनुष्य" अशा शीर्षकाने एक लेख लिहिला. त्यामुळे मात्र ते एकदम प्रसिद्धीच्या झोतात आले. त्यांना थोडा श्रोतृवृंद आधिक लाभला. ते एक श्रेष्ठ गायक आहेत, हे थोड्या अधिक लोकांना कळले आणि पटले. (थोडीफार अशीच स्थिती पु. ल. देशपांडे ह्यांनी वसंतराव देशपांडे ह्यांच्यावर लेख लिहिल्यामुळे वसंतरावांना प्रसिद्धी मिळणे आणि त्यांच्या गायनाची जाहिरात होणे ह्याबाबत घडली आहे.) हा मुद्दा महाराष्ट्रातील शास्त्रीय संगीतविषयक इतिहासाच्या दृष्टीने आणि त्यामध्ये असणाऱ्या कालबाह्य निकषांच्या दृष्टीने विचारात घेण्याजोगा








आहे. वयाच्या उत्तरभागात त्यांना अनेक मानसन्मान मिळाले. विद्यापीठात अध्यापन करण्याची संधी मिळाली. सुदैवाने वय वाढले तरी त्यांचे गाणे थकले नव्हते; शारीरिक स्वास्थ्य, आवाज, प्राणायामशक्ती, लयकारी हे सर्व खूप काळपर्यंत चांगले राहिले.

जयपूर घराण्यातील इतर अनेक गायकांप्रमाणेच मल्लिकार्जुन मन्सूर गानविद्येचे "मत्सरी उपासक" होते. त्यामुळे अनेकदा रागाचे नाव न सांगणे ह्यांसारखे प्रकार जयपूर घराण्यातील इतर गायकांप्रमाणेच मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांच्यातही होते. ह्या संदर्भातील एक दंतकथा, खरी-खोटी कशीही असो, उद्बोधक आहे. जयपूर घराण्यातील एका गायकाने एक राग गायल्यावर त्याचे नाव विचारले असता मी 'चुकून' काहीतरी गायलो ह्या अर्थी त्याने कुछ "खोकर" गाया असे उत्तर दिले. त्यामुळे त्या रागाचेच नाव पुढे "खोकर" असे झाले. ही दंतकथा किती विश्वसनीय आहे, ते ज्याचे त्याने ठरवावे. पण पुढे मी जी एक हकीकत सांगणार आहे, तिचा मी स्वतः साक्षीदार आहे; त्यामुळे मला वरील दंतकथा सत्यकथा असण्याची संभावना वाटते. मी सांगणार असलेली कथा २४ नोव्हेंबर १९७४ रोजी मुंबईतील गोरेगाव ह्या उपनगरातील एका कार्यक्रमाची आहे. ह्या कार्यक्रमासाठी मी पुण्याहून मुंबईला गेलो होतो. कारण त्या काळी पुण्यात मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे कार्यक्रम होत नसत (पु. ल. देशपांडे ह्यांनी त्यांचा कार्यक्रम अजून पुण्यात केला नव्हता.) ह्या कार्यक्रमात त्यांनी संध्याकाळचे भीमपलास, मालवी इत्यादी राग गायले. त्याबरोबर त्यांनी एक राग जो गायला, त्याचे नाव मला अजून कळलेले नाही. त्या रागाचे एकूण चलन 'मारवा' रागासारखे वाटत होते. "पिया बिन जियरा" अशी एरवी मारवा रागातीलच चीज ते गात होते. पण राग गात असताना ते कोमल गंधार लावत होते. मारवा रागात गंधार कोमल नाही; त्यामुळे हा मारवा नव्हे हे स्पष्ट झालेच होते. ह्या रागाचे नाव त्यांना विचारले असता त्यांनी सांगितले नाहीच; पण "चुकून गंधार कोमल लागला", असे उत्तर त्यांनी वर्तमानपत्रातील त्यांच्या गाण्याचा वृतांत लिहिणाऱ्या व्यक्तीस सांगितले. तसे ते नंतर वर्तमानपत्रात छापूनही आले होते. अर्थातच माझा ह्या 'चुकून' स्वर लागण्यावर विश्वास नाही. मल्लिकार्जुन मन्सूर हे अत्यंत सुरेल गायक होते हे त्यांचे गायन ज्यांनी ऐकले आहे, ते सर्वच मान्य करतील. ते मध्येच काही बेसूर असे गायन चुकून करतील, ह्यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. त्यातही प्रमाद कधीही घडू शकतो हे तत्त्वतः मान्य केले, तरी अर्धा तास गाताना तीच तीच चूक पुनःपुनः एखादा गायक करीत असेल, तर त्याचा साधा अर्थ तो काहीतरी वेगळेच गात आहे, असा होतो. मालकंसमध्ये कोमल निषादाच्या जागी तीव्र निषाद एखाद्या वेळी लागला तर तो चुकून लागला, असे म्हणता येईल; पण पुनःपुनः तो ऐकू येत असेल, तर तो चंद्रकंस हा राग आहे, असे ठरवावे लागेल. रागाचे नाव हे सोयीनुसार क्ष, य काहीही ठेवता येईल; पण ती एक वेगळीच रागनिर्मिती आहे, हे मान्य करावेच लागेल. संगीताच्या क्षेत्रात एखादा स्वर बदलून किंवा वर्ज्य स्वर घेऊन किंवा हवा असलेला गाळून अनेक राग निर्माण केलेले आहेत, ही गोष्ट संगीताच्या अभ्यासकांना माहीत आहे. त्यामुळे ह्या रागाला माझ्यापुरते मी, 'कोमल गंधाराचा मारवा' असे नाव दिले आहे. त्याला पूर्वी दुसरे जुने नाव काही दिले गेले असल्यास ते स्वीकारण्यास मी तयार आहे. भीमपलास राग गाताना कोमल निषाद अपेक्षित असताना बालगंधर्व तेथे तीव्र निषाद लावीत. अर्थातच ते त्यांचे सामर्थ्य आणि त्यांचा तो अधिकार होता. सामान्य गायकाने ते केले तर तो प्रयोग यशस्वी होईलच, ह्याची खात्री नाही. बालगंधर्वांच्या गाण्यातील 'तीखी नीषाद' ऐकण्यास मात्र अल्लादियाखान स्वतः येत आणि त्यांचे कौतुक करीत. नादसागर अपार आहे, हे या कथेचे एक तात्पर्य; आणि दुसरे तात्पर्य मल्लिकार्जुन मन्सूर आपल्या विद्येचे सहजपणे दान करू इच्छीत नव्हते, हे आहे. त्यामुळेच त्यांचा आपले गायन ध्वनिमुद्रित करण्यालाही विरोध असे, ह्या भूमिकेलाही आपण ह्याच दृष्टिकोणातून समजून घेतले पाहिजे. जयपूर घराण्याच्या ह्या 'मत्सरी संरक्षक वृत्ती'मुळेच आज ही गायकी, त्यांचे अनेक राग लुप्तप्राय झालेले दिसतात.

मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे संगीतक्षेत्रातील स्थान ह्या विषयाचे विवेचन करताना थोडक्यात असे म्हणता येईल की, त्यांच्या गाण्यात कमालीची परिपूर्णता,










नियमबद्धता दिसते. त्यात कोणत्याही प्रकारचे न्यूनाधिक दाखवणे जवळजवळ अशक्य आहे. ह्या परिपूर्णतेमुळेच त्यांना अभिजाततेचा परमोत्कर्षबिन्दू म्हणता येईल. त्यात कोणत्याही प्रकारची तडजोड सापडणार नाही. सोन्यामध्येही काहीवेळा इतर धातूंची भेसळ केलेली आढळते; पण शंभरनंबरी सोने, चोख सोने म्हणजे भेसळविरहित सोने. ते ज्याला परवडेल त्याने घ्यावे; नको असेल त्याने भेसळयुक्त सोने घ्यावे. मल्लिकार्जुन मन्सूर ह्यांचे गाणे शुद्ध सोन्यासारखे आहे. ते ऐकण्यासाठी, आवडण्यासाठी, आत्मसात करण्यासाठी श्रोताही एका विशिष्ट उच्च दर्जाचा, शिक्षित असणे अपेक्षित होते. म्हणूनच ते गायकांचे गायक होते, अभिजाततेचा परमोत्कर्ष होते, असे म्हणता येईल.





अनुक्रमणिका






# सेवाग्रामातील ग्रामसेवा

श्री. मा. भावे

गांधीजी १९१५ साली दक्षिण आफ्रिकेतून भारतात परतले. त्यानंतर त्यांनी साबरमतीच्या काठी आश्रम स्थापून आपले निवासस्थान बनवले. साबरमतीच्या काठचा हा आश्रम म्हणजे आफ्रिकेत गांधीजींनी ज्या प्रकारचे सामूहिक जीवन सुरू केले होते, त्याच प्रकारची व्यवस्था होती. ह्या आश्रमाला स्वतःची घटना होती. तेथील मुले आश्रमाच्या शाळेत शिकत. आश्रमवासीयांचा स्वयंपाक एकाच ठिकाणी होई व जेवणही एकत्र असे. आश्रमातील सर्व रहिवाश्यांना कामे वाटून दिलेली असत व घड्याळा-प्रमाणे ही कामे वेळच्या वेळी व सुयोग्य रीतीने पार पडावीत, असा गांधीजींचा कटाक्ष असे.

मार्च १९३० मध्ये गांधीजींनी कायदेभंगाच्या चळवळीची सुरुवात साबरमती आश्रमातून दांडीपर्यंतची सत्याग्रहयात्रा सुरू करून केली. त्या वेळी गांधीजींनी जाहीर केले की, हा त्यांनी केलेला शेवटचा लढा असेल व स्वराज्य मिळल्याखेरीज ते पुन्हा आश्रमात परतणार नाहीत. तुरुंगातून सुटल्यावर गांधीजी अहमदाबादला परतले; पण ते साबरमतीच्या आश्रमात राहिले नाहीत. त्यांनी ठरविले की, आश्रम बरखास्त करायचा. गांधींनी आश्रमाची जागा आणि इमारती सरकारला देण्याची तयारी दाखवली; पण सरकारने या गोष्टी स्वीकारल्या नाहीत. मग गांधीजींनी आश्रमाची मालमत्ता 'हरिजन सेवक संघा'ला देऊन टाकली. गांधीजींनी साबरमती आश्रम बंद करायचा आहे असे ठरवल्यावर जमनालाल बजाजांनी अशी तयारी दाखवली की, गांधीजी वर्ध्याला आल्यास त्यांना जमीन, इमारती आणि आश्रमाच्या खर्चासाठी पैसा आपण उपलब्ध करून देऊ. वल्लभभाई पटेलांचे म्हणणे होते की, गांधीजींनी गुजरात सोडून जाऊ नये. त्यांनी बार्डोली येथे आश्रम सुरू करावा. गांधीजींनी सप्टेंबर १९३३ मध्ये वर्ध्याला भेट दिली; पण अजूनही वर्ध्याला आश्रम स्थापावा, असा त्यांचा निश्चय झाला नव्हता. वर्ध्याहून गांधीजी अस्पृश्यतानिवारणाच्या दौऱ्यावर निघून गेले. १९२१ सालापासून विनोबाजी भावे वर्ध्याला राहत होते. त्यांनी तेथील आश्रम साबरमती आश्रमाची शाखा म्हणून चालवला होता. १० जून १९३४ रोजी गांधीजी वर्ध्याला आले व त्यांनी विनोबांची भेट घेतली. १२, १३ जून १९३४ रोजी काँग्रेस कार्यकारिणीची सभा वर्ध्यात झाली. त्यानंतर गांधीजी पुन्हा अस्पृश्यता-- निर्मूलनाच्या दौऱ्याला गेले.

दरम्यान गांधीजींच्या मनात काँग्रेसविषयीची नाराजी वाढत होती. गांधीजींनी सुरू केलेली कायदेभंगाची चळवळ काँग्रेसच्या कित्येक नेत्यांना पसंत नव्हती. कायदेभंग संपुष्टात आणावा आणि इंग्रज सरकारने नव्याने देऊ केलेल्या सुधारणा स्वीकारून विधिमंडळात निवडून जावे, असे काँग्रेसच्या कार्यकर्त्यांना व बऱ्याचशा नेत्यांना वाटू लागले होते. खादी, विधायक कार्य आणि अस्पृश्यता-- निर्मूलन यांविषयीची गांधीजींची भूमिका काँग्रेसला नापसंत होती. तथापि, गांधीजींना सर्वांत अस्वस्थ करणारी गोष्ट ही होती की, अहिंसेवरची काँग्रेसची श्रद्धा डळमळीत झाली होती. काँग्रेसच्या नेत्यांना असे वाटत होते की, इंग्रज सरकारसारख्या बलाढ्य शत्रूविरुद्ध अहिंसेच्या मार्गाने कायदेभंग करून लढणे हे धोरण म्हणून ठीक असले, तरी एक तत्त्व म्हणून अहिंसेला चिकटून राहणे हे व्यवहार्य नाही. गांधीजींचा विधायक कार्यक्रम स्वराज्य मिळविण्याच्या दृष्टीने कितपत उपयोगी आहे, याची लोकांना शंका होती. तेव्हा गांधीजींनी ऑक्टोबर १९३४ मध्ये काँग्रेसच्या मुंबईत भरलेल्या अधिवेशनात जाहीर केले की, आपण राजकारणातून निवृत्त होत आहोत.

काँग्रेसने ठराव करून गांधीजींच्या निवृत्तीची दखल घेतली आणि त्याच ठरावानुसार 'अखिल भारतीय ग्रामोद्योग संस्था' स्थापन करण्याचा निर्णयही जाहीर केला. ही संस्था गांधीजींच्या मार्गदर्शनाखाली काम करील आणि काँग्रेसच्या राजकीय कामाशी तिचा संबंध असणार नाही, असेही ठरविण्यात आले.








(१)

या संस्थेच्या स्थापनेमुळे जमनलाल बजाजांना आपल्यासमोर फार मोठी संधी चालून आली आहे असे, वाटले. त्यांनी वर्धा येथील आपला मोठा बाग-बंगला आणि वीस एकरांचा मळा या संस्थेला देणगी म्हणून देण्याचे ठरविले. गांधीजींनी ही देणगी स्वीकारली आणि डिसेंबर १९३४ मध्ये ग्रामोद्योग संस्थेची स्थापना झाली. जमनलालांचे मित्र श्रीकृष्णदास जाजू हे संस्थेचे अध्यक्ष झाले आणि गांधीजींचे भक्त जे. सी. कुमारप्पा हे संस्थेचे चिटणीस म्हणून काम करू लागले. ज्या ठिकाणी संस्थेची स्थापना झाली, त्या परिसराला 'मगनवाडी' असे नाव देण्यात आले.

इथे जे. सी. कुमारप्पा यांची थोडी माहिती दिली पाहिजे. कुमारप्पा यांचा जन्म १८९२ साली झाला होता. ते अमेरिकेतील सिरॅक्यूज विद्यापीठातून व्यवस्थापन-शास्त्राचे पदवीधर झाले होते. पुढे त्यांनी इंग्लंडमधील संस्थेकडून 'सनदी लेखापाल' या व्यवसायाचा परवाना मिळवला होता. त्यांनी मुंबईमध्ये व्यवसाय सुरू केला होता व त्यांना खोऱ्याने पैसा मिळत होता. १९२९ साली त्यांचा गांधीजींशी प्रथम संबंध आला तो असा– कुमारप्पांनी 'पब्लिक फायनान्स ॲण्ड इंडियन पॉव्हर्टी' या विषयावर एक प्रबंध लिहिला होता व अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठाकडे पदव्युत्तर पदवीसाठी पाठविला होता. कुमारप्पांनी हा प्रबंध गांधीजींकडे पाठविला. त्या प्रबंधात कुमारप्पांनी दाखविले होते की, ब्रिटिश अर्थकारणामुळे हिंदुस्थानची लुट चालली आहे व त्यामुळे देशातील गरिबी वाढते आहे. गांधीजींनी कुमारप्पांना भेटायला बोलावले. त्या वेळेला गांधीजी अहमदाबादेत होते.

९ मे १९२९ रोजी कुमारप्पा आपला भपकेबाज पोशाख करून गांधीजींना भेटायला गेले. त्यांनी पाहिले की, गांधीजी शेणाने सारवलेल्या जमिनीवर, तोकडा पंचा नेसून चरख्यावर सूत काढीत होते. भेटीच्या वेळेला अजून ५ मिनिटे अवकाश होता. तेवढ्यात गांधीजींचे लक्ष समोर उभ्या असलेल्या माणसाकडे गेले आणि हसून त्यांनी विचारले, "तुम्हीच कुमारप्पा ना?" बस्स! तेव्हापासून कुमारप्पा गांधीजींचे होऊन गेले. त्यांनी गांधीजींसाठी कैरा जिल्ह्यातील पन्नास खेड्यांचे सर्वेक्षण केले व खेड्यातील लोकांच्या गरिबीचा हिशेबच मांडून दाखवला. त्यांनी दाखवून दिले की, खेड्यातील माणसाला दररोज फक्त ७ पै (म्हणजे रुपयाचा २६ वा भाग) इतकेच उत्पन्न मिळते. फारच थोड्यांना काही रोजंदारी आहे आणि बहुतेक लोक बेकार अवस्थेत काळ कंठीत असतात. माणसे जशी विनाकामाची राहतात, तशीच त्यांची गुरे आणि अवजारे हीदेखील बेकार पडून असतात. तेव्हा ग्रामीण भागातील दारिद्र्य कमी करायचे असेल, तर ग्रामीण भागातील लोकांना उद्योग पुरवून त्यांच्या सामर्थ्याचा उपयोग करून घेतला पाहिजे.

जे. सी. कुमारप्पा यांना अशा रीतीने गांधीवादी अर्थशास्त्राची आणि ग्रामीण दारिद्र्याची पूर्ण माहिती होती. म्हणूनच ग्रामोद्योग संस्थेसाठी त्यांच्यापेक्षा लायक मनुष्य दुसरा नव्हता.

१९३५ सालापासून वर्धा हे गांधीजींच्या कार्याचे केंद्रस्थान बनत गेले. विनोबाजी आणि जमनलाल बजाज यांनी गेल्या १० वर्षांपासून वर्ध्याभोवतीच्या खेड्यांतून कार्य चालवलेच होते; आता गांधीजींमुळे त्या कार्याला नवीन गती मिळाली. जमनलाल यांच्या दैनंदिनीतून गांधीजी कसे काम करीत, याची शब्दचित्रे वाचायला मिळतात. उदा., ६ मे १९३६ रोजी जमनलाल लिहितात, 'आज खादीचे प्रदर्शन होते. सकाळी काही भजने झाल्यानंतर विनोबांनी एक सुंदर व प्रभावी व्याख्यान दिले. मागून बापूही बोलले. त्यानंतर आम्ही चरखा आणि टकळी यांवर सूत काढले. तीन वाजल्यानंतर कार्यकर्त्यांनी आपापली ओळख करून दिली. संध्याकाळी विनोबांनी समारोपाचे व्याख्यान दिले. रात्री तुकोडोजी महाराजांनी भक्तिगीते म्हटली. आम्ही रात्री दीड वाजता वर्ध्याला परत आलो. दुसऱ्या दिवशी गांधीजींनी ग्रामसेवा मंडळाच्या कार्यकर्त्यांना उद्देशून व्याख्यान दिले.'

(२)

मगनवाडीत जमनालालजींच्या बंगल्यातील निम्म्या भागात कुमारप्पांची राहण्याची जागा आणि 'ग्रामोद्योग संस्थे'ची कचेरी होती. उरलेल्या भागात गांधीजी आणि त्यांचा 'परिवार' उतरला होता. या 'परिवारा'त साबरमतीच्या आश्रमातील बरीच मंडळी होती–काकासाहेब कालेलकर,

मीराबेहेन, महादेवभाई देसाई, किशोरीलाल मश्रूवाला, प्यारेलाल व त्यांची बहीण सुशीला नायर. येथे मीराबेहेनची थोडी माहिती दिली पाहिजे. मीराबेहेन यांचे मूळ नाव मॅडेलेन स्लेड. यांचे वडील ब्रिटिश नौदलात उच्चाधिकारी होते. तरुणपणी या मुलीला बिथोव्हेन (१७७०-१८२७) या संगीतकाराच्या रचनांची धुंदी चढली आणि तिने जर्मनी, फ्रान्स या देशात प्रवास करून बिथोहेमच्या चरित्राचा शोध घेतला. तिला असे समजले की, रोमां रोलां (१८६६-१९४४) या फ्रेंच लेखकाची 'जिअँ ख्रिस्तोफ' ही कादंबरी बिथोव्हेनच्या चरित्रावर आधारलेली आहे. म्हणून ती रोलां यांना भेटायला गेली. त्या वेळी रोलां म्हणाले की, "मी नुकतेच गांधींवर एक पुस्तक लिहिले आहे." मॅडोलिनच्या चेहऱ्यावर कोणतेच कुतूहल दिसले नाही तेव्हा रोलां म्हणाले, "हा माणूस म्हणजे दुसरा ख्रिस्त आहे!"

रोलांनी लिहिलेले गांधींचे चरित्र वाचल्यानंतर मॅडोलिनला गांधींच्या भेटीची व त्यांच्या आश्रमात राहण्याची आकांक्षा निर्माण झाली. पण ती ताबडतोब हिंदुस्थानाला जायला निघाली नाही. आश्रमातील वास्तव्यासाठी तिला तयारी करायची होती. तिने मद्यप्राशन बंद केले, शाकाहार घ्यायला सुरुवात केली, जमिनीवर मांडी घालून बसण्याचा सराव केला, खादी मागवली व स्वत:साठी खादीचे फ्रॉक्स स्वतः शिवले. उर्दू शिकण्यासाठी तिने एक शिक्षक ठेवला. चरख्यावर सूत काढण्याचे तंत्र ती शिकली. गांधीजींच्या 'यंग इंडिया'ची वर्गणी तिने भरली. ही १९२४ सालची हकिकत.

याच वेळी गांधीजींनी हिंदू-मुस्लिम-एकतेसाठी तीन आठवड्यांचे उपोषण केले. मॅडोलिनला फार काळजी वाटली व ती रोज प्रार्थना करू लागली. सुदैवाने गांधीजी वाचले. त्यानंतर मॅडलिनने गांधीजींना पत्र लिहून आपण हिंदुस्थानात येण्याचे ठरवीत आहोत, असे कळवले. गांधीजींनी तिला लिहिले की, "तू हिंदुस्थानात यायला काहीच हरकत नाही. मात्र आश्रमातील राहणी सुखाची आहे, असे समजू नकोस. इथे फारच कष्ट घ्यावे लागतात. खेरीज, हिंदुस्थानचे हवा-पाणी तुला सोसले पाहिजे." हे सर्व धोके पतकरून मॅडेलिन १६ नोव्हेंबर १९२५ रोजी मुंबईला आली आणि दुसऱ्या दिवशी साबरमती आश्रमात पोचली. गांधीजींशी झालेल्या पहिल्या भेटीविषयी ती लिहिते, "मी त्यांच्या खोलीत गेले. एक किडकिडीत, सावळ्या रंगाची व्यक्ती उठली व माझ्याकडे आली. अंत:करण प्रकाशाने उजळले होते, याच्या पलीकडे मला काहीच जाणवले नाही. मी गुडघ्यांवर बसले. दोन हातांनी मला उचलले. एक आवाज म्हणाला, "तू मला मुलीसारखी आहेस." त्यानंतर मॅडेलिन आश्रमात रमली. रामायण, महाभारत, उपनिषदे तिने वाचली. ती 'मीराबेहेन' म्हणून ओळखली जाऊ लागली.

वर्ध्याला मगनवाडीत आल्यावर काय झाले त्याचे वर्णन मीराबेहेन यांनी आत्मचरित्रात केले आहे– "साबरमती आश्रमातील सगळी तऱ्हेवाईक माणसे मगनवाडीत होतीच; आणि जागा कमी असल्याने थोडी गर्दीच झाली होती. एका माणसाला झोपेत चालण्याची सवय होती आणि दुसरा एक माणूस त्याला पकडायला धावत असे! भर रात्रीत रक्त गोठवणाऱ्या किंचाळ्या ठिकठिकाणांहून ऐकू येत. इतक्या गोंधळातही बापूंचे काम चालतच असे." मगनवाडीतल्या या गर्दी-गोंधळातून सुटून एकान्त मिळवण्यासाठी मीराबेहेन गावाबाहेर फिरायला जात.

रोज त्यांना सिन्दी नावाच्या गावातून जावे लागे. त्या गावात त्यांच्या ध्यानी आले की, लोकांची घरे आतून स्वच्छ व नीटनेटकी असली, तरी गावातील गल्ल्या आणि घरांच्या आसपासची जागा घाणीने भरलेली असे. मीराबेहेनने गांधींच्या कानावर ही गोष्ट घातली, तेव्हा ते म्हणाले, "असं? मग आपण ती घाण काढली पाहिजे!" मीराबेहेननी दोन-तीन कार्यकर्ते बरोबर घेऊन साफसफाई करण्याचा प्रयत्न केला; पण तो फुकट गेला.

एक दिवस गांधीजींनी जाहीर केले की, "मी स्वतः सिंदीला जातो आणि तिथे एकटा राहतो. गावकऱ्यांच्या मदतीने जमेल तसा राहीन." गांधीजींच्या या घोषणेने खळबळ माजली. गांधी ६५ वर्षांचे होते. त्यांची प्रकृती तोळामासा होती. त्यांना एकट्याला सिंदीत राहू देणे धोक्याचे होते. आश्रमवासी मीराबेननाच दोष देऊ लागले. तिने सिंदीत लुडबुड केल्यामुळेच ही आपत्ती आली, असे त्यांचे म्हणणे पडले. तेव्हा मीराबेन म्हणाल्या, "मी सिंदीत जाऊन राहते, गांधीजींनी मगनवाडीतच राहावे." गांधी या तडजोडीला तयार झाले. मीराबेन सिंदीत एका

झोपडीत राहू लागल्या. पण सिंदीतील अस्वच्छता दूर होईना.

मग मीराबेननी असा विचार मांडला की, सिंदी हे गाव खरे खेडेगावच नाही. ती वर्ध्याच्या कुसावरची वस्ती आहे. आपण खऱ्याखुऱ्या खेड्यात जाऊन राहायला हवे. गांधीजी म्हणाले, "तू तुला हवे तसे खेडे शोधून काढ आणि तिथे राहा. मी सिंदीला दुसऱ्या कोणाला तरी पाठवतो." मीराबेन चौफेर हिंडल्या, विदर्भातील ती धुळकट, कोरडी व उखीर-वाखीर खेडी आणि या परदेशी बाईकडे तिरस्काराने पाहणारे खेडूत यांचा त्यांना उबग आला. पण अखेर त्यांना वर्ध्याच्या पूर्वेला चार मैलांवर असलेले 'सेगाव' हे खेडे सापडले, 'कमीत कमी नावडीचे', असा त्यांचा शेरा होता. गावाचे वैशिष्ट्य हे होते की, जमनालालजींचा तेथे एक मळा होता. एक कुडाची झोपडी व तिच्यावर कौलारू छप्पर अशा घरात मीराबेन राहू लागल्या.

मीराबेन सेगावला गेल्यानंतर गांधीजींची प्रकृती फारच बिघडली आणि ते अहमदाबादेला गेले. तेथे त्यांना मीराबेनची जी पत्रे गेली, त्यांवरून त्यांना वाटू लागले की, नव्या ठिकाणी मीराबेनना बऱ्याच अडचणी येत असाव्यात. तेव्हा त्यांनी निर्णय घेतला की, आपणच सेगावला राहण्यास जावे. गांधींच्या या निर्णयावर मोठाच गहजब झाला. नेहरू, पटेल, गांधींचे डॉक्टर्स, गांधींच्या परिवारातले लोक व स्वत: जमनालालजी या कोणालाही ही योजना आवडली नाही. गांधींच्या जवळच्या व्यक्तींना वाटणारी भीती अनाठायी नव्हती. सेगाव वर्ध्यापासून लांब होते. तेथे जायला गाडीरस्ताही नव्हता व पावसाळ्यात दलदल होऊन पायी जाणेही अशक्य होई. सेगावला हिवतापाचा उपद्रव होता आणि सापांचा सुळसुळाट होता. तथापि, गांधींचा निश्चय कायम होता.

तीस एप्रिल एकोणीसशे छत्तीस या दिवशी सकाळी गांधी वर्ध्याहून सेगावला जायला निघाले. सेगावापाशी झोपडी बांधायला जागा शोधावी, हा त्यांचा उद्देश होता. वाटेत त्यांना जमनालालांचा नोकर रूडमल भेटला. गांधींनी 'आपण सेगावला राहायचे ठरवले आहे', हे त्याला सांगितल्यावर तो म्हणाला, "छान! जमनालालजींकडून मगनवाडी तुम्ही बळकावलीतच; आता सेगावही ताब्यात घेणार!" गांधीजी म्हणाले, "माझ्यासारख्या माणसाकडून अशाच गोष्टी होतात!"

त्या दिवशी संध्याकाळी गांधीजींनी प्रार्थनासभा घेतली. तेव्हा ते भाषणात म्हणाले, "तुमची सेवा करण्यासाठी मी इथे आलो आहे. मीराबेन इथे त्याच उद्देशाने आल्या होत्या. पण त्यांची प्रकृती ठीक नाही...माझ्याविषयी ज्यांना संशय वाटतो किंवा भीती वाटते, त्यांच्यावर माझ्या पाहुणचाराचे कष्ट मी लादणार नाही....मी अस्पृश्यतेला विरोध करतो म्हणून माझी भीती तुम्हाला वाटते....माझा आग्रह आहे की, तुम्ही तुमचे पूर्वग्रह सोडावेत."

गांधींनी तेथील खेडुतांना सांगितले की, "अस्पृश्यता नाहीशी करण्याचा उद्देश आहेच; पण गाव स्वच्छ करावे आणि ग्रामोद्योगांना चालना द्यावी, अशीही माझी इच्छा आहे." गावकऱ्यांनी गांधीजींचे स्वागतच केले; पण एक पाटील उभा राहून म्हणाला की, "तुम्ही आलात याचा आनंदच आहे; पण अस्पृश्यतेबद्दलचे तुमचे विचार आम्हाला पटत नाहीत." गांधीजी हसून म्हणाले, "मी जे म्हणतो त्यातील शहाणपण हळूहळू तुम्हाला समजेल."

गांधीजी त्यानंतर म्हैसूरच्या दौऱ्यावर गेले. तिथून ते परतण्यापूर्वी त्यांची झोपडी बांधण्याचे काम त्यांनी मीराबेनवर सोडले. मगनवाडीतील दोन माणसे, बलवंतसिंग आणि मुन्नालाल शाह यांच्याकडून मीराबेननां हे काम करून घ्यायचे होते. तेवढ्यात मीराबेन स्वत:च आजारी पडल्या. बलवंतसिंग व मुन्नालाल यांना झोपड्या बांधण्याखेरीज मीराबेनची काळजी घ्यावी लागली. बरे, झोपडी बांधण्याचे काम करण्यास जेमतेम ४-५ आठवडे हाताशी होते! पण बलवंतसिंग व मुन्नालाल यांनी २९' x १४' आकाराची विस्तृत झोपडी बांधून दिली. झोपडीच्या चारी बाजूंनी ७ फूट रुंदीचा व्हरांडा होता.

गांधी १४ जून १९३६ रोजी वर्ध्याला परतले. आल्या- आल्या त्यांनी मीराबेनला निरोप पाठवला की, 'हवा अनुकूल असेल तर उद्या सकाळी ७ वा. मी सेगावला येतो.' दुसऱ्या दिवशी (१५ जून १९३६) जोराचा पाऊस पडला. पण त्याला न जुमानता, वयाच्या ६७ व्या वर्षी, गांधींनी पावसातून चार मैल चालून सेगाव गाठले. ते पावसाने चिंब भिजले होते व खळखळून

हसत होते.

गांधीजी झोपडीत राहू लागले तेव्हा बलवंतसिंग व मुन्नालाल म्हणाले, "आम्हीपण इथेच राहतो. तुमच्या-साठी अन्न शिजवू व राहू." गांधीजींनाही ते मान्य झाले. पुढे महिन्या दीड महिन्याने मगनवाडीहून कस्तुरबा, मनू गांधी, डॉ. खानसाहेब (खान अब्दुल गफारखानांचे बंधू) आणि तुकडोजी महाराज असे सारे आले व तेही त्याच झोपडीत राहायला लागले. एकच गजबजाट होऊन गेला. 'खेड्यात निवांतपणे राहू', हा गांधींचा बेत फिसकटून गेला. तेव्हा मग गांधीजींनी मीराबेनच्या लहान झोपडीत राहायचे ठरवले. आज 'बापू कुटीर' या नावाने ओळखली जाणारी झोपडी ती हीच.

आता गांधीजींना गावाकडच्या राहणीचे खरे सौख्य अनुभवायला मिळाले. त्यांनी राजकुमारी अमृत कौर यांना लिहिले, "ही झोपडी अगदी चित्रातल्यासारखी आहे. सध्या तुकडोजी महाराज माझ्या सोबत आहेत. नामांकित भजनी आहेत. झोपडीतच्या एका कोपऱ्यात ते राहतात आणि मी दुसऱ्या कोपऱ्यात आहे. मुन्नालालांनी तिसऱ्या कोपऱ्यात मुक्काम ठोकला आहे. आजूबाजूला मोकळी जागा आहे व सुंदर देखावा दिसतो. दिवसभर वारा वाहतो आणि स्वच्छ हवा मिळते. सारे कसे शांत, स्वच्छ आहे. सगळीकडे परिपूर्ण समाधान नांदत असते." या पत्राने राजकुमारी अमृत कौर इतक्या भारून गेल्या की, त्याही सेगावला येऊन गांधींच्याच झोपडीत राहू लागल्या.

सेगाव आणि शेगाव (गजानन महाराजांचे) यांत घोटाळा होऊ लागला. म्हणून सरकारने गांधीजींच्या संमतीने सेगावचे नाव 'सेवाग्राम' असे बदलून टाकले. सेवाग्रामची वसती गांधींना कितीही लोभसवाणी वाटली, तरी तिथे अतोनात कष्ट आणि धोके होते. वर्धा ते सेवाग्राम हा रस्ता, त्या पावसाळ्याच्या दिवसांत, दलदलीखाली हरवूनच गेला होता. थोड्याच दिवसांत आजारपणे सुरू झाली. मीराबेनना टायफॉइड झाला; बलवंतसिंगांना मलेरियाने पछाडले; अतिसार व कॉलरा यांचा धुमाकूळ चालू झाला; राजकुमारी अमृत कौर यांची तब्बेत इतकी बिघडली की, गांधीजींनी त्यांना सिमल्याला पाठवून दिले. स्वतः गांधीजी हिवतापाने इतके आजारी झाले की, त्यांना वर्ध्याच्या हॉस्पिटलात हलवावे लागले.

सेवाग्राम ते वर्धा हा रस्ता, रस्ता नव्हताच; फार तर एक बैलगाडीची वाट होती, असे म्हणता येईल. जमनालालजींनी या रस्त्यासाठी एक नवेच वाहन शोधून काढले. त्या वाहनाला ते 'ऑक्सफर्ड' असे म्हणत. त्यांची एक फोर्ड मोटार होती. तिचा, मागची आसने असणारा भाग त्यांनी निराळा केला व पुढच्या इंजिनाच्या जागी एक जू लावून बैल जोडण्याची व्यवस्था केली! याच वाहनातून नेहरू, पटेल, राजाजी वगैरे नेते वर्धा ते सेवाग्राम असा प्रवास करीत. मात्र पाऊस नसतानाच ह्या वाहनाचा उपयोग होई. एरवी बैलगाडी हेच उपयोगाचे वाहन होते. आपल्या दैनंदिनीत २७ जुलै १९३७ ला जमनालालांनी नोंदवले आहे की, "आज मी व मौलाना आझाद बैलगाडीने सेगावला आलो. जोराचा पाऊस पडला व मागून रिपरिप चालू होती. वाटेत बैलगाडीचे चाक निसटले. त्यामुळे आणखी उशीर झाला. बापूंशी फारच थोडा वेळ बोलणे झाले."

मुळात गांधीजींची कल्पना होती की, सेवाग्रामला आपण एकट्याने राहावे. ते अशक्यच होते. गांधीजींच्या परिवारातील कस्तुरबा, महादेवभाई देसाई, प्यारेलाल व त्यांची बहीण सुशीला नायर ही माणसे येणार, हे समजण्यासरखे होते. पण नंतर जरा दूरची असणारी माणसेही आली. गांधी सेवा संघाचे अध्यक्ष किशोरीलाल मश्रूवाला आले; राजकुमारी अमृत कौर आल्या; आर्यनायकम् व त्यांची बायको आशादेवी हे जोडपे आले; मॉरिस फ्रीडमन हा पोलंडमधला एंजिनिअर होता व अहिंसा आणि हस्तोद्योग यांवर त्याची श्रद्धा होती, तोही आला. परचुरेशास्त्री यांना महारोग झाला होता. ते संस्कृतचे विद्वान होते. गांधीजी स्वतः त्यांची शुश्रूषा करीत. ते कुठे जाणार? 'बापू कुटिरा' शेजारच्या झोपडीत ते राहिले. असे नाना तऱ्हेचे एककल्ली आणि विचित्र लोक सेवाग्रामला आले. सरदार पटेलांनी या मनुष्य-समूहाला 'प्राणिसंग्रहालय' असे नाव दिले होते. गांधीजी म्हणत, "माझ्याभोवती अपंग माणसांचा गराडा पडला आहे. त्याला 'वेड्यांचा बाजार' म्हटले तरी चालेल. गमतीची गोष्ट ही की, वेड्यांना आपण वेडे

आहोत असे वाटत नाही आणि मी स्वतःला शहाणा समजतो!"

सेवाग्राममधील आश्रमाचा व्याप वाढतच चालला. सेवाग्राम ते वर्धा हा रस्ता तयार झाला. पोस्ट ऑफिस झाले. आश्रमात व गावात आजारी माणसे इतकी होती की, एक रुग्णालय काढावे लागले. आश्रमाला दुधाचा पुरवठा करण्यासाठी गोशाळा तयार केली. गांधीजींनी विधायक कार्यासाठी निरनिराळ्या संस्था काढल्या होत्या. त्या संस्थांच्या मुख्य कचेऱ्या आश्रमात आल्या.

सेवाग्रामातील आश्रम साबरमतीच्या आश्रमापेक्षा निराळा होता. साबरमतीच्या आश्रमातील सभासद काही एका शिस्तीने व वेळापत्रकाने बांधलेले होते. 'एकत्र राहणे' हा साबरमतीच्या आश्रमाचा मूलमंत्र होता. मात्र सेवाग्रामात जो तो आपापल्या पद्धतीने राहत असे. त्यांनी आपल्या निःस्वार्थ सेवेतून अहिंसेची वाट चोखाळावी, एवढीच गांधीजींची अपेक्षा असे. गांधी व त्यांची उद्दिष्टे यांच्यावरील श्रद्धा एवढीच त्या सर्वांना एकत्रित ठेवणारी आणि त्यांच्या आयुष्याला अर्थ देणारी शक्ती होती. सेगाव हे अगदीच मागासलेले गाव होते. गावात अस्पृश्यता कटाक्षाने व कठोरपणाने पाळली जाई. हरिजनांची फारच परवड होत असे. गांधीजींनी अस्पृश्यतेविरुद्ध अनेक पावले उचलली. आश्रमातील विहीर अस्पृश्यांना खुली केली. गोविंद नावाच्या हरिजन मुलाला आपला स्वयंपाकी नेमले. गावातील कर्मठ व अस्पृश्यतावादी लोकांशी चर्चा केल्या. पण गावातील प्रतिष्ठित लोक म्हणत, "महात्माजी, तुम्हाला सारे माफ आहे; पण आम्ही साधी माणसे तसे वागू शकत नाही."

गांधीजींना वाटे की, अस्पृश्यतेमुळे गावाच्या आर्थिक प्रगतीलाही खीळ बसते. भंग्याला इतर अस्पृश्यदेखील अवहेलनेने वागवतात. हरिजनांतदेखील जातीची उतरंड आहेच. काही हरिजन जाती इतरांपेक्षा अधिक 'शुद्ध' मानल्या जातात. पण भंग्यांना अशी वागणूक मिळत असल्याने गावातील स्वच्छता सांभाळणे अवघड होते. विष्ठा वेळच्या वेळी न उचलली गेल्याने रोग फैलावतात. विष्ठेचा खरेतर खत म्हणून चांगला उपयोग होतो. पण 'विष्ठा उचलणे अपमानास्पद मानल्याने ती शेतात नेऊन टाकायला शेतकरी तयार होत नाही.

गांधीजींनी सेगावातील बारीकसारीक कुरबुरींत लक्ष घालून आपली शक्ती व्यर्थ खर्चावी हे नेहरू, पटेल यांना पटत नसे. त्या दोघांनी ३ ऑक्टोबर १९३६ रोजी गांधीजींची भेट घेतली व आपली नापसंती त्यांच्या कानी घातली. नेहरूंनी विचारले, "या सगळ्या (गावाच्या विकासाच्या) खटपटी तुम्हीच करायला हव्यात का?" गांधीजी म्हणाले, "दुसरे कोण आहे, हे करायला? तुम्ही गावात जाल तर दिसेल की, गावातल्या ६०० पैकी ३०० माणसे आजारी आहेत. ती सगळी काय हॉस्पिटलात जातील? त्यांना स्वतःचा आजार स्वतःच कसा बरा करावयाचा, हे शिकवावे लागेल. आपण स्वतः याचा धडा त्यांना घालून द्यायला नको का? आपण एक गाव जरी अज्ञान, दारिद्र्य आणि आजार यांपासून मुक्त केले, तरी ते साऱ्या देशाला आदर्श होऊन राहील."

तथापि, सेवाग्रामाचे आदर्श ग्राम [illegible]चे महात्माजींचे स्वप्न प्रत्यक्षात येणे दुरापास्तच होते. आहारात सुधारणा घडवणे, गावातले रस्ते व बोळ स्वच्छ आणि उत्तम स्थितीत ठेवणे, ग्रामोद्योगांना चालना देणे, दारू आणि दुराचार यांना आळा घालणे यांसाठी गांधीजी व त्यांची सहकारी यांनी कसून प्रयत्न केले. पण या प्रयत्नांच्या साफल्यविषयी, गांधीजी सेवाग्रामला आल्यानंतर साडेतीन वर्षांनी, महादेवभाईंनी लिहिले, "आम्ही बऱ्याच लोकांना काम मिळवून दिले; पण पगार अगदीच तुटपुंजा होता. आम्ही अस्पृश्यतेच्या विरोधात जोराचा प्रचार केला. गावातील थोड्या लोकांना चरख्याची दीक्षा दिली. मुलांना आमच्या कार्याकडे आकर्षित करून घेतले व 'नयी तालीम' या शैक्षणिक प्रकल्पात ओढले. परंतु हे खेडे व आश्रम यांतील दुरावा कमी झाला नाही. आम्ही त्यांच्यात आणि आमच्यात जिव्हाळ्याचे नाते निर्माण करू शकलो नाही."

गांधीजींना या जिव्हाळ्याची उणीव जाणवली होती. त्यांची इच्छा होती की, गावकऱ्यांच्या मनातील भीती व संशय पार करून आश्रमवासीयांनी त्यांच्या प्रेमाचा विषय व्हावे. यात दोन अडचणी होत्या गावकरी स्थितिप्रिय आणि अक्रियाशील होते; आणि जीव ओतून व निःस्वार्थपणे काम करणाऱ्या कार्यकर्त्यांची वानवा होती.

शहरी सुशिक्षित वर्गामध्ये खेड्यातील रयतेला पराकोटीच्या गरिबीतून ओढून वर काढण्याविषयी जाणीवपूर्वक किंवा अजाणता, निरुत्साहच होता.

**टीपा :** १) या महिन्यात गांधीजींची पुण्यतिथी आहे.

२) हा लेख बी. आर. नंदा यांच्या लेखांवर आधारलेला आहे. पुस्तक : In search of Gandhi.

३) सेवाग्राम आश्रमाच्या स्थापनेला यंदा ८० वर्षे होतील.



---



अनुक्रमणिका

# भारतीय कालपटाचा विल्यम जोन्सने घातलेला घोळ

हरगोविंद म. होले

भारताच्या प्राचीन इतिहासात कालगणना युधिष्ठिर संवताला धरून होते. या संवतानुसार मोजलेली वर्षे युगाब्द या संज्ञेने दर्शवितात. त्यानंतर भारतात शकाची राजवट युगाब्द २५४४ या वर्षी सुरू झाली. तेव्हापासून शकांनी देशातील कालगणनेत सिरीयन संवत किंवा प्रवर्धमानसंवत सुरू केला. गुप्तवंशातील विक्रमादित्याने शकांचा पराभव केल्यानंतर विक्रमसंवत सुरू केला. हा विक्रमसंवत युगाब्द ३०४४ या वर्षी सुरू झाला. पुढे शालीवाहनसंवत युगाब्द ३१८० या वर्षी सुरू करण्यात आला. थोडक्यात म्हणजे प्राचीन भारतीय कालगणनेसाठी युगाब्दाचाच उपयोग करणे सोयीचे आहे. तथापि इंग्रजांचे राज्य इथे आल्यावर इंग्रज अधिकाऱ्यांनी खिस्ती संवतानुसार कालगणना करण्यास सुरुवात केली; आणि प्राचीन इतिहासातील घटनांचा काळही ख्रिस्ती संवताच्या आधाराने ते दर्शवू लागले. हे करताना त्या इतिहासकारांनी, मुख्यतः विल्यम जोन्सने, अनेक घोटाळे केले. त्यामुळे आपण जो इतिहास शिकतो, त्याची कालगणना अतिशय चुकीची झालेली आहे.

ख्रिस्ती संवताची गोष्ट वेगळी आहे. ख्रिस्त असताना किंवा ख्रिस्ताच्या मृत्यूनंतर लगेच ख्रिस्तसंवत सुरू झाला नाही. ख्रिस्ती धर्माचे अनुयायी युरोपात बऱ्याच मोठ्या संख्येने झाल्यानंतर त्यांना ख्रिस्ताच्या नावाचा संवत सुरू करावा असे वाटू लागले. ख्रिस्ताच्या मृत्यूनंतर ८१६ वर्षांनी ख्रिस्ती धर्मगुरू एकत्र आले व ख्रिस्ताच्या मृत्युदिनापासून ख्रिस्तसंवत मोजावा, असा ठराव त्यांनी केला व पुढे ख्रिस्ताच्या मृत्यूनंतर ८७९ वर्षांनी जर्मनीच्या राजाने ख्रिस्त संवत मोजण्यास मान्यता दिली. अरब व्यापाऱ्यांमार्फत हा ख्रिस्तसंत्रत भारतात इसवी सनाच्या १० व्या शतकात आला. सारांश, ख्रिस्तसंवत १००० च्या पूर्वी भारतात आढळणे शक्य नाही. भारताच्या प्राचीन इतिहासातील कालगणना करण्याचे महत्त्वाचे साधन म्हणजे पुराणांतून ज्या वंशावळी दिल्या आहेत, त्या होत. परंतु इंग्रज इतिहासकारांना पुराणांतील वंशावळींची नीट माहिती नव्हती. तसेच पुराणांतील कालगणना युगाब्दानुसार होत होती, युगाब्द इ. स. पूर्व ३१०२ या वर्षापासून सुरू होतो, हेही त्यांना माहीत नव्हते. त्यामुळे इंग्रज आणि पाश्चात्त्य यांनी लिहिलेल्या भारताच्या इतिहासातील कालगणना फार चुकीची झाली आहे. उदा., विल्यम जोन्सने शिशुनागवंशापासून पैगंबराचा काळ इ. स. पू. ६४२ + इ. स. ६२२ = १२६४ वर्षांचा दाखवला आहे; आणि तो म्हणतो की, राजा हर्षवर्धन आणि पैगंबर हे समकालीन होते. या बाबतीत खालील तक्ता उपयोगी ठरेल.

| अ. क्र. | वंश | जोन्सने दर्शविलेला काळ | पुराणांप्रमाणे काळ | फरक |
|---|---|---|---|---|
| १. | शिशुनाग इ.स.पू ६४२ते ३६४ | २७८ | ३६२ | ८४ |
| २. | नंद इ. स. पू. ३६४ ते ३२२ | ४२ | १०० | ५८ |
| ३. | मौर्य इ. स. पू. ३२२ ते १८५ | १३७ | १७३ | ३६ |
| ४. | शुंग इ. स. पू. १८५ ते ७३ | ११२ | ११२ | - |
| ५. | काण्व इ. स. पू. ७३ ते २८ | ४५ | ४५ | - |
| ६. | सातवाहन इ. स. पू. २८ ते इ. स. ३१८ | ३४६ | ४५६ | ११० |
| ७. | गुप्त इ. स. पू. ३१८ ते ४६५ | १४७ | ३०० | १५६ |
| ८. | गुप्त ते वाल्हिक गुप्त | - | ४४ | ४४ |
| ९. | वाल्हिक गुप्त ते हर्ष | - | २८१ | २८१ |
| १०. | गुप्त ते हर्ष-पैगंबर इ. स. ४६५ त ६३५ | १७० | ५४५ | ३७५ |
| | | १२७७ | २४१८ | ११४१ |

येथे गुप्तांचा काळ विल्यम जोन्सने इ. स. ३१८ ते ४६५ असा दाखवला आहे, तो चुकीचा आहे. याला आधार असा की, मगधावर पालवंशातील राजा विग्रहपाल हा विक्रमसंवत ५४७ मध्ये राज्य करतो, असा

त्या राजाचा शिलालेख आहे. विक्रमसंवत ५४७ म्हणजे शालीवाहन शक ४८९ येतो. आर्यभट्ट हा गणिती विग्रहपालाचा आश्रित होता. विग्रहपालापूर्वी व नंतर मिळून ४-५ पालराजांनी मगधावर राज्य केले, हे ध्यानात घेता गुप्तवंशाचा काळ इ. स. ४०० च्या पूर्वी संपलेला असला पाहिजे. यावरून गुप्तांचा काळ ठरविण्यात विल्यम जोन्सने चुक केली आहे, असे वाटते. आपण तक्त्यात बघितले आहेच की, जोन्सने दिलेला काळ आणि पुराणांप्रमाणे ठरलेला काळ यांत सुमारे ११०० वर्षांचा फरक येतो. तेव्हा असे म्हणण्यात हरकत नाही की, विल्यम जोन्सने जो घटनेचा काळ दिला असेल, त्याच्या सुमारे ११०० वर्ष आधी संबंधित घटना घडलेली असली पाहिजे.

आता आपण वर दिलेला तक्ता पुराणांत दिलेल्या वंशावळींच्या आधारे मांडून युधिष्ठिरापासून इसवी सनाच्या सुरुवातीपर्यंतची कालगणना दाखवू.

भारतात वापरात होता.

शकांनी आणि गुप्तराजा विंध्यशक्ती यांनी मिळून सातवाहनांची सत्ता नष्ट केली. विंध्यशक्तीचा समकालीन शकराजा कनिष्क काश्मिरात युगाब्द २६२२ मध्ये म्हणजे सिरियन संवत ७८ मध्ये झाला. इंग्रज इतिहासकारांनी मोठा घोटाळा केला. त्यांनी सिरियन संवत १ हाच ख्रिस्त संवत १ असे मानले आणि कनिष्काचा काळ सिरियन संवत ७८ हा ख्रिस्त संवत ७८ म्हणून दाखवला. यावरून दिसून येईल की, इंग्रजानी मांडलेला कालपट हा पूर्णपणे गफलतीचा आहे.

गुप्तांच्या राज्यांची दोन केंद्रस्थाने होती. एक मगध, दुसरे अवंती. गुप्तवंशातील चंद्रगुप्त विक्रमादित्य हा अवंती येथे राज्य करत होता. त्याच्या पदरीराहमिहिर हा विख्यात ज्योतिषी होता. वराहमिहिराने सांगितले आहे की, युगाब्द २५५५ मध्ये सिरियन राजांची सत्ता सुरू होईल. वराहमिहिराच्या या विधानाला पाठिंबा देणारा

| वंश | वंशाच्या कारकिर्दीची सुरुवात | कारकिर्दीचा काळ | कारकिर्द संपण्याचे वर्ष |
|---|---|---|---|
| युधिष्ठिर | इ. स. पू. ३१०२ | ३६ वर्षे | इ. स. पू. ३०६६ |
| परीक्षित ते अरिंजय | इ. स. पू. ३०६६ | १०० वर्षे | इ. स. पू. २०६६ |
| काश्यप | इ. स. पू. २०६६ | १३२ वर्षे | इ. स. पू. १९३४ |
| प्रत्योध | इ. स. पू. १९३४ | १३८ वर्षे | इ. स. पू. १७९६ |
| शिशुनाग | इ. स. पू. १७९६ | ३६२ वर्षे | इ. स. पू. १४३४ |
| नंद | इ. स. पू. १४३४ | १०० वर्षे | इ. स. पू. १३३४ |
| मौर्य | इ. स. पू. १३३४ | १७३ वर्षे | इ. स. पू. ११६१ |
| शुंग | इ. स. पू. ११६१ | ११२ वर्षे | इ. स. पू. १०४९ |
| काण्व | इ. स. पू. १०४९ | ४५ वर्षे | इ. स. पू. १००४ |
| सातवाहन | इ. स. पू. १००४ | ४९६ वर्षे | इ. स. पू. १००४ |
| गुप्त | इ. स. पू. ५४८ | ३४४ वर्षे | इ. स. पू. २०४ |
| विक्रम | इ. स. पू. २०४ | २०४ वर्षे | इ. स. पू. ० |

यावरून दिसून येते की, सातवाहनांची सत्ता इ. स. पू. ५४८ या वर्षी म्हणजे युगाब्द २५५४ मध्ये समाप्त झाली. त्यापूर्वी युगाब्द २५४४ मध्ये शक राजांनी मध्ये आशियात सिरियन संवत सुरू केला. तो युगाब्द २५५४ मध्ये भारतात आला आणि पुढे १७०० वर्षे

शिलालेख अर्जुनकोंडा येथे आहे. हा शिलालेख रुडि पुरूसदत्त या सिरियन क्षत्रपाचा असून सिरियन संवत ११ मध्ये लिहिलेला आहे. म्हणजे नेमका युगाब्द २५५५ मध्ये. गुप्त चंद्रगुप्त पहिला याचा कानखेडा इथला शिलालेख सिरियन संवत २१३ म्हणजे युगाब्द २७५७ या वर्षाचा



अनुक्रमणिका

आहे. गुप्त चंद्रगुप्त पहिला याने या वर्षी सिरियन सत्तेचा पराभव केला, असे या शिलालेखात म्हटले आहे. तीन वर्षे स्वतंत्र राज्य करून चंद्रगुप्त पहिला ५३ व्या वर्षी मरण पावला. त्याचा मुलगा समुद्रगुप्त युगाब्द २७६० मध्ये राज्यावर आला. या समुद्रगुप्ताच्या कारकिर्दीत सिरियन संवत २२७ मध्ये म्हणजे युगाब्द २७७१ मध्ये अलेक्झांडरचे भारतावर आक्रमण झाले. हे वर्ष (३१०२-२७७१=)३३१ (इ.स.पू.) हे होय.

मेग्यास्थेनिस म्हणतो की, महाभारतकाळापासून २७६० वर्षे झाली असता सॅण्डोस्क्रॅट नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्यापर्यत युधिष्ठिरापासून १३८ पिढ्यांनी राज्य केले. आपण युधिष्ठिरापासून चंद्रगुप्त मौर्यापर्यंत पिढ्या मोजल्या, तर त्या फक्त ७२ भरतात. पण समुद्रगुप्तापर्यंत पिढ्या मोजल्यास १३४ किंवा १३५ एवढ्या होतात. असे असताना विल्यम जोन्सने सॅण्डोस्क्रॅट म्हणजे चंद्रगुप्त मौर्य असे ठरवून भारतीय कालगणना फार पुढे ओढली आहे.

सेल्युकस-निकेटरचा पाडाव अवंतीच्या गुप्त वंशातील राजा चंद्रगुप्त दुसरा याने केला. पुढे त्याने बौद्ध धर्म स्वीकारला, असा उल्लेख मेग्यास्थेनिसने केला आहे. मेग्यॉस्थेनिस चंद्रगुप्त मौर्यांच्या दरबारात नव्हता, तर तो चंद्रगुप्त विक्रमादित्य या गुप्तवंशातील राजाच्या दरबारात होता. मेगॉस्थेनिसच्या 'इंडिका' या ग्रंथात मौर्य या नावाचा उल्लेख नाही, तसेच कौटिल्याचाही उल्लेख नाही. यावरून हे स्पष्ट होते की, विल्यय जोन्सने मौर्यांच्या काळी अलेक्झांडची स्वारी झाली असा चुकीचा निष्कर्ष काढला आहे. ही गोष्ट त्याने बहुधा विचारपूर्वक केली असावी. ही त्याची निर्हेतुक चूक झाली असे म्हणता येणार नाही.

गुप्तांची सत्ता हूणांनी व विक्रमवंशातील राजा यशोवर्धन याने नष्ट केली. या विक्रमवंशात ९ राजे झाले. त्यांचा काळ सुमारे २९०ते ३०० वर्षांचा दिसून येतो, सिरियन संवतानुसार ५०० वर्षांनी म्हणजे युगाब्द ३०४४ किंवा इ.स.पू.५८ या वर्षी विक्रमसंवत सुरू झाला.विक्रमवंशातील शेवटचा राजा हर्षवर्धन याने विक्रमसंवतानुतर १३५ वर्षांनी म्हणजे युगाब्द ३१७९ या वर्षी शालीवाहनसंवत सुरू केला. हर्षवर्धनाच्या काळात ह्यु-एन-त्संग हा चिनी बौद्ध प्रवासी भारतात आला होता.

बूल्हेर या इतिहासकाराने असे म्हटले आहे की, नेपाळमधील राजघराण्यांच्या इतिहासातील महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख युगाब्द या संवताचा उपयोग करून होतो. तथापि त्याचे इंग्रज इतिहासकारांनी इ. स. पू. वर्षात रूपांतर करताना असंख्य चुका केल्या. बुल्हेरचे हे म्हणणे केवळ नेपाळच्या बाबतीत खरे नसून संपूर्ण भारताच्या इतिहासाच्या बाबतीत खरे आहे. प्राचीन भारताच्या इतिहासातील कालगणना इंग्रजांनी इ. स. पू. वर्षामध्ये करून मिथ्या इतिहास लोकांपुढे मांडला आहे.





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# भारत-पाकिस्तान संबंध*

## (काही मिथ्या कल्पना व अर्धसत्ये)

व. भ. कर्णिक

भारत आणि पाकिस्तान यांच्यामधील संबंधांविषयी चर्चा करताना नेहमी काही ठरावीक मुद्दे पुढे मांडले जातात. त्यांपैकी काही मुद्दे मिथ्या कल्पनांवर व अर्धसत्यावर आधारलेले असतात. मूळ प्रश्नाचा नीट विचार व्हावा आणि निष्कारण गैरसमज वाढू नये, या दृष्टीने त्या मुद्द्यांची थोडी चिकित्सा झाली, तर बरे होईल.

हरघडी ऐकू येणाऱ्या एका मुद्द्याचा जरा विचार करू या. तो मुद्दा असा की, पाकिस्तान हे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे अपत्य आहे. ठोकळमानाने हे विधान खरे आहे; पण जरा खोल विचार केला तर आढळून येईल की, ते एक अर्धसत्य आहे.

मुसलमानजमातीला हिंदी राष्ट्रामध्ये समाविष्ट करून घेण्याच्या कार्यात हिंदी राष्ट्रवाद अपेशी ठरला; म्हणून पाकिस्तान निर्माण झाले, हे विसरून कसे चालेल? शिवाय अखेरीला पाकिस्तान निर्माण झाले ते काँग्रेस व मुस्लिम लीग या दोनही संस्थांच्या पुढाऱ्यांच्या संमतीने, हेदेखील लक्षात ठेवणे जरुरीचे आहे. काँग्रेसने नाकारले असते, तर इंग्रजी साम्राज्यशाहीला पाकिस्तान निर्माण करता आले नसते. अर्थात त्यामुळे भारतीय स्वातंत्र्य लांबणीवर पडले असते, ही गोष्ट वेगळी.

स्वातंत्र्य शक्य तितक्या लवकर मिळावे म्हणून भारताच्या राष्ट्राधुरीणांनी पाकिस्तानच्या निर्मितीला संमती दिली. आणि त्यामुळे भारत व पाकिस्तान ही दोन स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्रे एकाच क्षणी जन्माला आली. ज्या घटनेला आपण जाणूनबुजून, सर्व गोष्टींचा विचार करून संमती दिली, तिलाच आज इंग्रजांची निर्मिती म्हणून हिणवण्यात काय हशील? इतिहास लिहायला बसलेल्या माणसाने ते विधान केले, तर ते समजू शकते; पण भारत-पाकिस्तान संबंधांच्या चर्चेमध्ये ज्या वेळी ते वापरले जाते, त्या वेळी त्यामध्ये सत्यकथनाऐवजी मनामध्ये घर करून राहिलेला पाकिस्तानबद्दलचा आकस दृष्टीस पडतो, असे म्हणता येणार नाही का?

भारताबद्दलच्या द्वेषाच्या पायावर पाकिस्तानची उभारणी झाल्यामुळे त्याला भारताबद्दल कधीही प्रेम वाटणे शक्य नाही, असा दुसरा एक आक्षेप घेण्यात येतो. इथे भारत आणि भारतीय एकराष्ट्रवाद यांमध्ये गल्लत करण्यात येते. पाकिस्तानच्या निर्मात्यांचा विरोध होता तो एकराष्ट्रवादाला; भारताला नव्हे. मुसलमानजमातीचे स्वतःचे वेगळे राष्ट्र झाले पाहिजे, हा त्यांचा आग्रह होता. आणि त्यामुळे त्यांनी काँग्रेसला विरोध केला. परंतु पाकिस्तानाच्या निर्मितीनंतर भारताला विरोध करीतच राहिले पाहिजे, अशी त्यांची भूमिका नव्हती. तसे पाहिले तर सुरुवातीला तरी निदान भारत व पाकिस्तान यांनी गुण्यागोविंदाने शेजारी म्हणून नांदले पाहिजे, अशी दोन्ही राष्ट्रांच्या पुढाऱ्यांची इच्छा होती. ती इच्छा फलद्रूप झाली नाही, ही गोष्ट वेगळी. पण पहिल्यापासूनच पाकिस्तानच्या मनात भारताबद्दल द्वेष व दुस्वास होता, असे मानायला जागा दिसत नाही.

एकराष्ट्रवाद आणि द्विराष्ट्रवाद ही परस्परविरोधी तत्त्वे आहेत हे खरे. एका राष्ट्रात हे दोन्ही वाद प्रभावी तत्त्वे म्हणून नांदू शकणार नाहीत, हेदेखील तितकेच खरे. पण द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करून पाकिस्तान मिळवल्यानंतर त्या तत्त्वाचे आता काय महत्त्व उरले? त्या तत्त्वाच्या बळावर भारतातील मुसलमानांना भाराताविरुद्ध बंड करायला चिथावणी देणे एवढाच फारतर आता पाकिस्तानला त्या तत्त्वाचा उपयोग. पण या चिथावणीला भारतीय मुसलमान बळी पडतील अशी कल्पना करणे म्हणजे आपल्या एकराष्ट्रीयत्वाच्या सिद्धांतावर अविश्वास व्यक्त करण्यासारखे आहे.

---

* ***नवभारत*** जानेवारी १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.

अनुक्रमणिका

द्विराष्ट्रवादाला आज जे महत्त्व आहे ते केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे; कार्यप्रणाली म्हणून आता त्या वादाला महत्त्व नाही. राष्ट्र म्हणून जन्माला आल्यानंतर राष्ट्र या नात्यानेच पाकिस्तानला इतर राष्ट्रांशी व भारताशीदेखील व्यवहार ठेवावा लागतो. आणि भारतानेदेखील तोच न्याय पाळला पाहिजे. भारत-पाकिस्तान संबंधांच्या बाबतीत द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करून पाकिस्तान जन्माला आले, या गोष्टीला आज महत्त्व नाही.

भारतीय मुसलमान द्विराष्ट्रवादाचा पुरस्कार करते, तर त्या वादाचा विचार करणे जरूर झाले असते. पण पुरस्कार करण्याऐवजी ते त्या वादाचा धिक्कारच करीत आले आहेत. त्यांच्याऐवजी काही कट्टर हिंदुधर्माभिमानीच त्या वादाचा पुरस्कार करताना दृष्टीस पडतात. आणि उलट, पाकिस्तान द्विराष्ट्रवादावर आधारलेले म्हणून भारताचे त्याच्याशी जमणे शक्य नाही, असा युक्तिवादही त्यांच्याच तोंडून ऐकू येतो.

पाकिस्तान हे धर्माधिष्ठित (Theocratic) राज्य आहे, असा एक नेहमीचा प्रवाद आहे. केवळ उथळ दृष्टीने पाहिले, तर तो प्रवाद खरा वाटतो. इस्लाम हा पाकिस्तानचा राज्यधर्म (state religion) आहे. पण इस्लामला राज्यधर्माचे स्थान देणारी इतरही राष्ट्रे आहेत. तसेच एखाद्या धर्माला राज्यधर्माचे स्थान देणारी जगामध्ये पुष्कळ राष्ट्रे आहेत. इंग्लंडचाही त्यांमध्ये समावेश होतो. इंग्लंडसारख्या राष्ट्राला धर्माधिष्ठित राज्य (theocratic state) म्हणता येईल का? म्हणून धर्माधिष्ठित राज्य म्हणून पाकिस्तानचा धिक्कार करण्यापूर्वी त्या देशात कशा पद्धतीचे राज्य आहे आणि ते कोण चालवते आहे, हे जरा काळजीपूर्वक पाहिले पाहिजे. पाकिस्तानमध्ये मुल्लांचे अगर मौलानांचे राज्य नाही. हे वेगळे सांगावयास नको. तिथले राज्यकर्ते भारतातल्या राज्यकर्त्याप्रमाणेच पाश्चात्त्य विद्याविभूषित आहेत. त्यांचा अग्रणी सँढर्स्ट येथे शिकून तयार झालेला, सर्व आधुनिक तंत्रांचे ज्ञान असलेला, आधुनिक पद्धतीने राहणारा व विचार करणारा अद्ययावत् सेनानी आहे. पाकिस्तानच्या सामाजिक व आर्थिक कार्यक्रमाकडे नजर टाकली तरीही असे दृष्टीस पडते की, त्याची जी खटपट चालली आहे ती आधुनिक, विसाव्या शतकातील प्रगत व प्रबळ राष्ट्र म्हणून पुढे येण्याची. म्हणून नव्याने स्वतंत्र झालेली इतर राष्ट्रे आणि पाकिस्तान यांमध्ये फरक करणे फार कठीण आहे.

पाकिस्तानमध्ये मुसलमानेतरांना मुसलमानांच्या बरोबरीची वागणूक मिळत नाही, हे खरे. आणि त्या दृष्टीने सुसंस्कृत राष्ट्र या नात्याने भारताचा दर्जा पाकिस्तानच्या मानाने कितीतरी श्रेष्ठ आहे. पण हे श्रेष्ठत्व सांगणे आणि त्याचा अभिमान बाळगणे वेगळे आणि पाकिस्तानला धर्माधिष्ठित राज्य मानून त्या कारणासाठी त्याच्याशी संबंध न ठेवणे अगर त्याचा दुस्वास करणे हे वेगळे. धर्माला जरी प्रमुख स्थान देण्यात आलेले असले, तरी पाकिस्तानचा कारभार आधुनिक पद्धतीनेच चाललेला आहे आणि आधुनिक राष्ट्र म्हणून त्याला जगामध्ये नांदायचे आहे.

पाकिस्ताना मध्ये लष्करी हुकूमशाहीचे राज्य आहे, हादेखील असाच एक अर्धसत्यावर आधारलेला आक्षेप आहे. भारतातल्यासारखे तिथे संसदीय लोकशाहीचे राज्य नाही, हे खरे. तसेच तिथे लोकांच्या स्वातंत्र्यावर व हक्कांवर अनेक मर्यादा पडलेल्या आहेत, हेदेखील तितकेच खरे. तरीही तिथे विरोधी पक्ष आहेत, ते आपली मते प्रसिद्ध करू शकतात आणि त्यांचा प्रचार करू शकतात, तसेच ते निवडणुका लढवू शकतात हे विसरून चालणार नाही. तसेच तिथे स्वतंत्र वर्तमानपत्रे आहेत, स्वतंत्र बाण्याने न्यायदान करणारी न्यायालये व विश्वविद्यालये आदिकरून स्वतंत्र संस्था आहेत, हेदेखील लक्षात घेतले पाहिजे. म्हणून हुकूमशाही आहे हे खरे; पण पाकिस्तानमधील हुकूमशाही ही साम्यवादी राष्ट्रांमधील हुकूमशाहीसारखी नाही, हे ध्यानात घ्यायला हवे. हुकूमशाहीमध्येदेखील फरक असतात, हे वेगवेगळ्या हुकूमशाही देशांकडे पाहिले की, लक्षात येते.

शिवाय परराष्ट्रसंबंधांच्या बाबतीत लोकशाहीवादी राष्ट्रांशीच संबंध ठेवायचा, हुकूमशाहीवादी राष्ट्रांशी ठेवायचा नाही, असा काही भारताचा नियम नाही. भारताच्या मित्रराष्ट्रांत आजदेखील रशिया, युगोस्लाव्हिया, ईजिप्त आदी हुकूमशाही राष्ट्रे आहेत. आणि ते भारताने उद्घोषित केलेल्या पंचशील तत्त्वांनुसारच आहे. दुसऱ्या राष्ट्रांच्या अंतर्गत व्यवस्थेत ढवळाढवळ करायची नाही.

हे पंचशीलमधील एक महत्त्वाचे तत्त्व आहे. आपल्या देशातील राज्यकारभाराची पद्धत ही त्या देशातील लोकांनी ठरवायची असते; त्यामध्ये बाहेरच्या राष्ट्राने अगर लोकांनी हस्तक्षेप करू नये, हे तत्त्व मान्य केल्यानंतर पाकिस्तानला वेगळा न्याय कसा लावता येईल? पाकिस्तानमध्ये जनतेचे लोकशाहीचे राज्य व्हावे, असे वाटणे साहजिक आहे. पण तसे राज्य स्थापन झाल्याखेरीज भारत-पाकिस्तान संबंध सुधारणार नाहीत, असे म्हणणे योग्य ठरणार नाही.

भारत आणि पाकिस्तान यांच्यामधील संबंधांबद्दल अनेक दृष्टींनी विचार होणे आवश्यक आहे. तसे विचारमंथन आज देशामध्ये चालू आहे. पण ते विचारमंथन मिथ्या कल्पनांनी आणि अर्धसत्यांनी गढूळ होऊ नये अशीदेखील खबरदारी घेतली पाहिजे. खबरदारी घेण्याचा उद्देश एवढाच की, मूळ मुद्द्यांचा चौकस बुद्धीने व राष्ट्रहिताच्या दृष्टीने विचार व्हावा आणि निर्णयावर भ्रामक समजुतींची छाप पडू नये.



जुने लेखन

# संकेतगृहें

समाजस्वास्थ्य मासिकातून

संध्याकाळी सात आठ वाजण्याचे पुढे वेश्या रहात असलेल्या शहराच्या भागांतून जातांना, सामाजिक हितासंबंधींची थोडीबहुत तरी कळकळ वाटणाऱ्या कोणत्याही व्यक्तीचे हृदय द्रवल्याशिवाय राहणार नाही. मुंबईस फोरास रोड, फॉकलंड रोड व त्या बाजूचे इतर भाग यांमधून पायीच काय, पण ट्रॅममधून किंवा गाडीतून जाणाऱ्या माणसाच्या मनांत देखील, रस्त्यांतून जाणाऱ्या व्यक्तींचे पोषाख, हावभांव व भाषा व खिडक्यांतून आणि गजांच्या आडून रस्त्यावरील पुरुषांची मने आकर्षून घेऊ पाहणाऱ्या वेश्यांचे समूह ही सर्व पाहून आपण, ज्या मनुष्यजातींचे एक घटक आहोत त्याच जातींत ही मंडळीही मोडते, हा विचार येईल व आपल्या सामाजिक रचनेंत काय चुकते आहे हे शोधून काढण्याकडे त्याची प्रवृत्ति झाल्यास नवल नाही. हा वर वर्णन केलेला सर्व प्रकार उत्तम आहे व त्यांत काही वाईट नाही असे बहुधा कोणालाच वाटत नसेल अशी प्रस्तुत लेखकाची समजूत आहे, पण कित्येकांना जर फक्त त्यांतील अश्लीलपणा, गलिच्छपणा व दारिद्र्य हेच वाईट वाटले तर दुसऱ्या कित्येकांना वेश्यागमन हे कृत्यच मुळी मुळापासून वाईट आहे असे वाटेल, एवढाच काय तो फरक.

हीन दर्जाची संतति उत्पन्न करून अथवा सांसर्गिक रोगांचा फैलाव करून दोन व्यक्ती ज्यावेळी समाजस्वास्थ्याचा बिघाड करतील त्याचवेळी फक्त त्यांच्या स्वतंत्रतेला आळा घालण्याचा समाजाला अधिकार राहील, या दोन्ही गोष्टीत जर त्यांनी योग्य ती खबरदारी घेतली तर मग वयांत आलेल्या कोणत्याही दोन स्त्रीपुरुषांना स्वतःच्या शरीराचा हवा तसा उपयोग करण्याची मोकळीक असली पाहिजे. अर्थात कोणत्याही स्त्रीला तिसऱ्याच एखाद्या व्यक्तीने आपल्या शरीराचा विक्रय करण्यास भाग पाडता कामा नये, व ही गोष्ट आता कायद्याने बहुतेक देशांत मान्य केलेली आहे. पण तिची स्वतःचीच इच्छा जर आपल्या शरीराचा विक्रय करण्याची असेल तर वरील दोन कारणाखेरीज दुसऱ्या कोणत्याही कारणांकरता समाजाला–कायद्याला–त्यांत ढवळाढवळ करता येणार नाही.

हे सर्व जरी खरे असले तरी मुंबई किंवा कलकत्ता यासारख्या मोठ्या शहरातून काय, पण दाट वस्तीच्या लहान लहान शहरांतून देखील वर वर्णन केल्यासारखे जे प्रकार रोज दिसतात ते मोठेसे इष्ट आहेत असे नाही. तहान, भूक इत्यादीप्रमाणेच पण त्यापेक्षांही कित्येक वेळी अतिशय महत्त्वाची अशी कामप्रवृत्ति प्रत्येक सामान्य स्त्रीत व पुरुषांत असते, आणि पाणी पिण्यास जसे स्वच्छ भांडे हवेसे वाटते, किंवा जेंवायची जागा ज्याप्रमाणे नुसती स्वच्छच नव्हे तर शक्य तितकी प्रसन्न व सुशोभित असावी अशी आपण काळजी घेतो, त्याचप्रमाणे कामेच्छा जेथे तृप्त केली जाते ती जागाही सुशोभित व शक्य तितकी सुंदर असणे इष्ट आहे. कामेच्छा पूर्ण होण्यास नेहमी दोन व्यक्ति लागतात व त्या दोघांचा एकमेकांशी इतका निकट संबंध येतो की त्यांना एकमेकांविषयी, निदान त्या वेळेपुरते कां होईना अतिशय प्रेम वाटते. कामेच्छा पूर्ण करून घेणे हा प्रत्येक मनुष्याचा हक्क आहे व कोणत्याही समाजाची आर्थिक, धार्मिक किंवा रूढीविषयक स्थिती जर या हक्काच्या आड येत असलेल तर ती आवश्य बदलली पाहिजे. शिवाय शारीरिक व मानसिक आरोग्याला अत्यंत आवश्यक अशी जी ही गोष्ट, ती अंधारात, घाणेरड्या जागी व दारू किंवा इतर मादक पदार्थांच्या नशेत व्हावी ही गोष्ट अत्यंत अनिष्ट आहे. वेश्या व्यापार बंद करावा की न करावा व ते शक्य आहे की काय हा विचार बाजूला ठेवला तरी सद्यस्थिती सुधारणे फार जरूर आहे हे उघड आहे. या दृष्टीने संकेतगृहासंबंधीची पुढे दिलेली सूचना फार महत्त्वाची असून सर्वांनी विचार करण्यासारखी आहे.

स्त्रीपुरुषांचा शरीरसंयोग (मग त्यांचा विवाह झालेला

असो अगर नसो) ही एक अत्यंत पवित्र गोष्ट असल्यामुळे, ज्यांना तो शक्य तितक्या सुशोभित व प्रसन्न ठिकाणी करावयाचा असेल त्यांच्याकरता सरकार किंवा म्युनिसिपालिटी यानी संकेतगृहे बांधावी. या संकेतगृहाची व्यवस्था मानवी गुणधर्म समजून त्यांच्याबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या व्यवस्थापकांच्याच हवाली केलेली असावी व प्रसूतिगृहांप्रमाणेच समाजहित सांभाळणाऱ्या संस्थांतच त्यांची गणना व्हावी. या गृहातील सर्व वातावरण असे असावे की, कामेच्छा पूर्ण करणे हे एक काही मिनिटांचे पाशवी काम नसून त्यात एक विलक्षण जादू भरलेली आहे व ते पवित्र काम दोन्ही व्यक्तींना कल्पनातीत सुख व आरोग्य देणारे आहे, अशी प्रत्येकांची समजूत व्हावी. या गृहांतच 'संततिनियमन' व 'गुप्त रोगांपासून बचाव' यांची माहिती देणारे स्त्री व पुरुष डॉक्टर असून दोन्ही प्रकारची साधनेही विकत मिळण्याची तेथेच व्यवस्था असली पाहिजे. याशिवाय, मुले व्हावी अशी इच्छा असलेल्या जोडप्यांची वैद्यकीय तपासणी या गृहातच करून त्यांना योग्य तो सल्ला देण्याची व्यवस्था असावी. त्याचप्रमाणे खालच्या मजल्यावर भोजनाची व्यवस्था असून उत्तम प्रकारची स्नानगृहेही असावीत. वरच्या मजल्यावरील खोल्यांचा उपयोग प्रत्येक जोडप्याला एक रात्रभर करण्याची परवानगी असावी व त्याबद्दल त्यांचेकडून माफक भाडे घेण्यात यावे. या खोल्यात भिंतीवर नामांकित चित्रकाराच्या चित्रांच्या प्रतिकृति, स्वच्छ चादरी व पांघरुणे असलेले पलंग, थोडी फार फुले, स्वतंत्र मोरी व शौचकूप इ. सोयी असाव्या. शिवाय या गृहातच संभाषण करीत बसता येईल असे दिवाणखाने, वाचनालये, रेडिओ इत्यादी सोईही असणे जरूर आहे. अशा प्रकारची संकेतगृहे जर निदान प्रत्येक मोठ्या शहरांत होतील तर अविवाहित जोडप्यांच्या संभोगाला देखील एक निराळेच वळण लागेल व वेश्यागमन करणारे लोक देखील अशा गृहांचा उपयोग करू लागतील. घाणेरड्या जागी कामेच्छा तृप्त करण्याची कोणाला हौस असते असे नाही. व वेश्येला घेऊन का होईना पण अशा संकेतगृहात जर एखादा पुरुष गेला तर त्याला संतति व रोग ही दोन्ही टाळता येतील. इतकंच काय, पण सुट्टीच्या दिवशी गाडी करून बायकोला राणीच्या बागेत किंवा अपोलो बंदरावर घेऊन जाणारा मध्यम स्थितीतील मनुष्य सुद्धा कामेच्छा तृप्त करण्यासाठी बायकोसह जाऊन एखाद्या रात्रीपुरती संकेतगृहांतील एखादी सुंदरशी खोली भाड्याने का घेणार नाही?

संकेतगृहासंबंधीच्या योजनेची केवळ रुपरेषा वर दिलेली आहे, त्यांत पुष्कळांना निरनिराळे फेरफार सुचवतां येतील. उदाहरणार्थ मादक पदार्थांच्या नशेत असलेल्या कोणत्याही स्त्रीपुरुषांना अशा प्रकारच्या संकेतगृहात प्रवेश मिळणार नाही. त्याचप्रमाणे ज्यांचे कपडे पुरेसे स्वच्छ नसतील त्यांना भाड्याने परटाकडून आलेले कपडे वापरण्यास मिळण्याची सोय संकेतगृहांतच करण्यासारखी आहे. अशा बारीकसारीक बाबी पुष्कळ सुचवता येतील. परंतु मुद्दयाची गोष्ट म्हणजे रुग्णालये, व्यायामशाळा, इत्यादी संस्था चालवणे आपले कर्तव्य आहे असे ज्या सरकारला वाटते त्यानेच संकेतगृहांचा सोय कां करू नये?

---

**मागासलेले विचार.** मे २८ (१९२८) रोजी येथे भरलेल्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्ष या नात्याने सौ. गिरिजाबाई केळकर यांनी जे भाषण केले त्यातील बरेच विचार आमचे मते अत्यंत पारंपरिक व मागासलेले आहेत :-

१. मी जरी आता पुरुषासारखी या खुर्चीवर बसले आहे, तरी पण (खुर्चीवर बायकांसारखे कसे बसायचे? सं) २. अलीकडच्या नाटकातून जे बीभत्स प्रकार आणि ग्राम्य विनोद दृष्टीस पडतात, ते पाहून लेखकांना सत्यसृष्टीत काय घडते याची जाणीव नसावीसे वाटते. (हे प्रकार नाटकांशिवाय कोठेही दिसत नाहीत काय? सं.) ३. एकंदर जे नवरस आहेत त्यांतील एक शृंगार जर थोडा कमी केला तर नाटकाची कोणत्याही प्रकारची विशेष हानि होईल असे वाटत नाही. (अर्थात बीभत्स रसास आधीच चाट मिळाल्यामुळे सात रस राहिले. पुष्कळ झाले!) कालिदास, भवभूति वगैरे मूर्ख बेटे! अशा रीतीने नाटक नीरस झाले म्हणजे प्रेक्षकांचा विरस होणारच, हा दहावा रस सौ गिरिजाबाईंस पसंत आहेसे दिसते. सं.) ४. ह्याचबरोबर आतां नवा येऊ पाहणारा प्रश्न स्त्रीनटांचा आहे. पाश्चात्यांचे अंध (गिरिजाबाईंस

न आवडणारे. सं.) अनुकरण करण्याची जी आमची प्रवृत्ती तीच या बाबतीत दिसून येते. ... आम्ही हिंदु लोक, आमच्या संस्कृति फार निराळ्या आहेत.... हिंदु लोक कधीही स्त्रीला आपल्या बरोबरीचे लेखीत नाहीत तर तिला आपल्याहून वरिष्ठ समजतात. (साफ खोटे! सं.) ५. स्त्री म्हणजे देव्हाऱ्यांतील देवता; तिचे काम म्हणजे स्वतः पवित्र रहायचे.... पहा बरे! कोणाच्याही देवळांतील देवता कधी बाहेर पडली आहे काय? ह्या पवित्र वस्तूला नानारूपांत, नानावेषांत जगापुढे उभे करायला तुम्हाला योग्य वाटते का? (स्त्रियांचे अंगी विनय विशेष वसतो, असे सौ. गिरिजाबाईच म्हणतात. तसे असते तर एका स्त्रीच्या तोंडून हे विचार बाहेर पडले नसते! सं.) ६. त्यांच्यात जर कोणी पतित असतील, कोणाला उदरनिर्वाहाचे साधन मिळवणे भाग असेल, तर त्याकरतां काही दुसऱ्या तजविजी करा. (त्या कोणत्या? सं.) पण त्यांना नाटककंपनीत नटी होण्याची लालूच दाखवू नका... मनुष्य एकदां टाळ्यांच्या गजराला व वरकरणी होणाऱ्या कीर्तीला भाळला म्हणजे तो स्वतःला, स्वतःच्या योग्यतेला विसरतो. मग ह्या तर काय? बिचाऱ्या अबला! (देवता कोठे गेल्या? सं.) यांना जर वन्स मोर च्या टाळ्या मिळू लागल्या किंवा वर्तमानपत्रात छापलेले नांव दिसले तर यांच्यासारख्या अज्ञ बायका भुलल्यास नवल कोणते? या मायामोहातून तरून जाणे मनुष्यमात्राला अवघड.... (वक्त्यांसही टाळ्या मिळतात व यांचीही नावे व फोटो प्रसिद्ध होतात, तरी सौ. गिरिजाबाई अध्यक्ष होतातच! सं.) ७. म्हणून स्त्रियांच्या साहाय्याशिवाय आपली रंगभूमि चालली पाहिजे व त्यांत उत्तम नागरिक नट झाले पाहिजेत. (एकंदरीत नाटकाचा धंदा हलकटच! पण आमची करमणूक तर झाली पाहिजे, तेव्हा पुरुषांनी तो करावा. आम्ही देव्हाऱ्यांत बसू. आणि तुम्ही आमच्यापुढे नाचा, जरूर पडल्यास कांहीजण हिजडे व्हा व विशेषतः हे सर्व उत्तम नागरिकांनी केले पाहिजे! वेश्यांनी किंवा नायकिणींनी सुद्धा या धंद्यात पडता कामा नये, इतका हा हलकट आहे. परंतु उत्तम पुरुष नागरिकांनी मात्र त्यांत पडावे, कारण ते पडले पुरुष! विनयाचा कळस झाला! सं.)

**टीप :** 'समाजस्वास्थ्य' मालिकेतील निवडक लेख' या मासिकातील १९३१ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकातून हे लेख घेतले आहेत.

❁❁❁

---

**छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत' ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २०१४ पासून रू. ४००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.**

# खनिज स्रोतांकडून वनस्पतीज स्रोतांकडे

मुरारी तपस्वी

रासायनिक उद्योगांमध्ये खनिज तेलाला पर्याय म्हणून वनस्पतींपासून मिळवलेल्या तेलांकडे मोठ्या आत्मीयतेनं पाहिलं जात आहे. त्याची मुख्य कारण दोन खनिज तेलाचा मर्यादित साठा आणि दुसरं म्हणजे त्याच्या अति वापरामुळे प्रदूषणाची उंचावणारी पातळी. अमेरिकन हल्लीच खनिज तेलांच मोठ्या प्रमाणात देशांतर्गत उत्पादन सुरू केल्यामुळे त्याचे बाजारभाव सध्या तरी आटोक्यात आहेत. नाहीतर वाढते भाव हे ही एक महत्त्वांच कारण होतं. प्रदूषणाचे चटके मात्र आता सगळ्यांनाच जागतिक तापमानवाढीच्या स्वरूपात जाणवू लागले आहेत. १०-१५ वर्षांपूर्वी जेव्हा वैज्ञानिक याची शक्यता ओरडून सांगत होते तेव्हा ते विनोदानं, उपहासानं आणि तुच्छतेने ऐकलं जायचं. आता मात्र अति पाऊस पडणे, अवेळी पडणे, अजिबात न पडणे, हवेत सतत उकाडा हे नित्याचंच झालं आहे आणि त्यामुळे हा विषय सामान्य माणसापासून ते जगांच राजकारण करणाऱ्यांपर्यंत सगळ्यांच्याच तोंडी आहे आणि म्हणून वनस्पती तेलांकडे एक अक्षय आणि पर्यावरणाला अनुकूल असा स्रोत म्हणून पाहिलं जात आहे. औद्योगिक विकासाची कास ज्या राष्ट्रांनी गेल्या काही दशकात धरली तेथे शेती उद्योग कमी होत गेला. जर वनस्पती तेल उद्योगांसाठी कच्च्या मालाचा स्रोत म्हणून उदयाला आली तर शेती उद्योगालाही पुनः महत्त्व प्राप्त होऊन मोठ्या प्रमाणात रोजगार निर्मिती होईल असं मानलं जातं. वनस्पती तेलांमधल्या मेदाम्लांचा वापर आजही साबण, सौंदर्य प्रसाधनं, वंगण, शाई, विरलतकं (Diluent) वगैरे उद्योगांमध्ये मोठ्या प्रमाणात केला जात आहे. ही तेलं वापरून पॉलिमर राळेची (रेझिन्सची) निर्मितीही होऊ शकते आणि म्हणून तो खनिज तेलाला पर्याय ठरू शकतो हे लक्षात आलेल आहे आणि आता मोठ्या प्रमाणात त्या शक्यता तपासून पाहण्यासाठी संशोधन सुरू आहे. एकाच प्रकारच्या सेंद्रिय रेणूंची लांबलचक साखळी म्हणजे पॉलिमर. पॉलिमर्सचा वापर आज प्रत्येक मानवाच्या आयुष्याचा एक अविभाज्य भाग झालेला आहे. वेगवेगळ्या स्वरूपात पॉलिमर्सपासून बनलेल्या वस्तूंचा वापर प्रत्येकजण करतच असतो पॉलियुरेथेन्स (Polyurethanes--PU) हा पॉलिमर राळेचा (रेझिन) एक प्रकार. याचा वापर फर्निचर, गाद्या-उशा, वाहन उद्योग, बांधकाम पादत्राणं, विविध प्रकारची उपकरणं (Appliances), तसेच लेपांमध्ये (रंग, रोगण (वॉर्निश), चिकटद्राव (Adhesives),भेगा आणि छिद्र बुजवायला (Sealants), रबरासारखा लवचिक गुणधर्म (Elastomers) असणाऱ्या वस्तू बनवायला केला जातो. चिकटपणा, मूळ वस्तूंवर ओरखडे न येऊ देणं, पाणी आणि आम्लासारख्या वहनशील द्राव्य वस्तूंचा मूळ वस्तूंवर परिणाम न होऊ देणं, धातूंच्या वस्तूंवर गंज न चढू देणं हे पॉलियुरेथेन्सचे महत्त्वाचे गुणधर्म.

कृत्रिमरित्या पॉलियुरेथेन्सचं उत्पादन करणारे उद्योग आता नैसर्गिक स्रोत वापरून याचं उत्पाउदन कसं घेतलं जाईल याकडे लक्ष देत आहेत. त्यांची जैवतंत्रज्ञान संशोधनात होणारी गुंतवणूक आणि अशा कंपन्यांमधला वाढता सहयोग या उत्पादनाच्या वाढीस पूरक ठरणार आहे. यावर होत असणारं संशोधन उद्या केवळ कार्बन उत्सर्जनाचं प्रमाण आटोक्यात आणणारं ठरणार नाहीये तर अशा उत्पादन प्रक्रियेतून, या घटकेला ते महाग असलं तरी, आर्थिक सुबत्तेकडेही प्रवास करता येईल असा विश्वास त्यांना वाटतोय. अमेरिका, इंग्लंड, फ्रांस, जर्मनी, चीन या देशात आता प्लास्टिकमधलं जैविक घटकांचं प्रमाण अधिकतम असावं यासाठी कायेदे केले जात आहेत आणि त्याचा परिणामही हे उत्पादन वाढण्यावर होणार आहे. मागणीचा विचार केला तर उत्तर अमेरिकेत याचा वापर मोठ्या प्रमाणात होत असल्याचं दिसून येत आहे. फोर्ड मोटार कंपनीच्या मोटारीच्या सीट्समध्ये आत्ताच जैविक घटक वापरून






बनवलेल्या पॉलियुरेथेन्संच प्रमाण ७० % पर्यंत पोचल आहे भारतातही पॉलियुरेथेन्स बनवणारा उद्योग स्थिरावला आहे. त्यात काही मोजक्या कंपन्या एरंडाच्या तेलापासून पॉलियुरेथेन्संच उत्पादन घेत आहेत. ही एक जमेची बाजू. पॉलिमर्सचं उत्पादन सध्या जवस, एरंड करडई, सोयाबीन सारख्या खाद्य तेलांचा वापर करून घेतलं जातं आणि याचं प्रमाण वाढलं तर त्याचा मानवाच्या अन्न उपलब्धतेवर विपरित परिणाम होऊ शकतो. ही बाब लक्षात घेऊन आता अखाद्य तेलांचा वापर करणं कितपत शक्य आहे याबाबत मोठ्या प्रमाणात संशोधन होत आहे. याचे दोन फायदे : एक तर मानवाच अन्न सुरक्षित राहील आणि दुसरं म्हणजे ज्या तेलबिया खाद्यतेलांसाठी वापरल्या जात नाहीत त्यांची मागणी वाढेल. मोहाच्या तेलबियांपासून पॉलियुरेथेन्स बनवणं कितपत शक्य आहे हे तपासून पाहिलं जात आहे. हा पानगळीवृक्ष त्याच्या तेलबियांसाठी प्रसिद्ध आहे.

भारतासारख्या उष्णकटिबंधीय प्रदेशात, विशेषतः महाराष्ट्र, पश्चिम बंगाल, ओरिसा, दक्षिणेकडील जंगलात हे विपुल प्रमाणात आढळतात. प्रत्येक वृक्षामागे ५ ते २०० किलो बी वृक्षाच्या आकारावर आणि वयावर अवलंबून –गोळा केलं जातं. दहा वर्षांनंतर या वृक्षापासून व्यावसायिक स्तरावर उत्पादन घ्यायला सुरुवात होते आणि मग साठ वर्षं ते देतच राहात. साठाव्या वर्षी त्याचं बिया देण्याचं प्रमाण सुरुवातीपेक्षा जवळ-जवळ दसपट वाढलेले असतं. सध्या देशात मोहाच्या बियांपासून १,८०,००० टन अखाद्य तेलाची निर्मिती केली जातेय. हा कल्पवृक्षच आहे म्हणाना! त्याच्या प्रत्येक भागातून फुल, फळं, फांद्या– आर्थिक उत्पन्न घेता येतं. मोहाच्या बियांपासून ३०-४०% मेद तेल गाळता येतं. सध्या त्याचा वापर डिटर्जंट, साबण उद्योगात केला जात आहेच. इंधनातही याच मिश्रण कितपत योग्य आहे हे तपासलं जात आहे.

आजच्या घडीला एखाद्या टाकाऊ (म्हणून स्वस्त) वस्तूंचा टिकाऊपणा वाढवायचा असेल तर पॉलियुरेथेन्सचे लेप देऊन त्याच्या टिकाऊपणात काही फरक पडतो का आणि त्या वस्तुंची उपयोगिता वाढवता येते का हे ही शोधलं जात आहे. उदाहरणार्थ पार्टिकल बोर्ड हे एक स्वस्त, अत्यंत हलकं, आणि हवा तो आकार देता येणारं साधन असल्यानं तयार फर्निचर बनवायला त्याचा वापर केला जातो. पण प्लायवुड पेक्षा पार्टिकल बोर्ड कमी टिकाऊ. जिथं देखावा अधिक आणि भक्कमपणा कमी महत्त्वाचा असेल तिथचं आजच्या घडीला पार्टिकल बोर्डचा वापर केला ज़ातो पार्टिकल बोर्ड थेट ऊन हवेतील दमटपणामुळे लवकर खराब होऊ शकतो. त्याला वाळवीसदृश्य जीवांची लगेच लागण होऊ शकते आणि म्हणून त्याचा वापर टाळला जातो. पण पॉलियेरेथेन्सचा लेप लावून त्याची उपयुक्तता वाढवता आली तर? हेच संशोधकांनी हेरलं. नांदेडच्या स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठात यावर संशोधन होत आहे. त्यांनी मोहाच्या तेलामध्ये मिथिलिन आणि टोलविन यांचे मिश्रण करून दोन प्रकारचे पॉलियुरेथेन (अनुक्रमे PU-M आणि PU-T) बनवले आणि त्याचा लेप मूळ वस्तंचा टिकाऊपणा कितपत वाढवतो याच्या वेगवेगळ्या परीक्षा घेतल्या. त्यांना त्यात बऱ्यापैकी यश आलं असं दिसून येतंय.

त्यांनी पार्टिकल बोर्ड व्यतिरिक्त याचे लेप पोलादी पत्र्यांवरही लावले आणि त्याच्या उपयोगितेच्या निरनिराळ्या परीक्षा घेतल्या, हे लेप साधारण अर्ध्या तासात वाळले. ओरखड्यांच्या परीक्षेत PU-T चा लेप PU-M च्या लेपापेक्षा उजवा ठरला. पेन्सिलचं काठीण्य ज्या मोजमापावर निर्धारित केलं जातं त्या मोजमापावर PU-M आणि PU-T या दोन्ही लेपांचं काठीण्य पोलादी पत्र्यांवरील लेपापेक्षा पार्टिकल बोर्डवरील लेपावर जास्त आढळलं. शिवाय दोन्ही प्रकारचे लेप लवचिकता चाचणीत उत्तीर्ण झाले. लेप लावलेल्या वस्तूंवर सूर्यप्रकाशाचा काहीच परिणाम ( mar-resistance ) झालेला आढळला नाही. पोलादी पत्र्यांवर रासायनिक प्रक्रियेचा कितपत परिणाम होतो हे ही तपासलं गेलं. लेप लावलेल्या पत्र्यांवर आम्लं, आल्कली आणि द्रावकांचा विशेष परिणाम होत नसल्याचं आढळलं. आम्लांचा लेपाच्या चकाकीवर थोडा परिणाम होत असल्याचं ते पत्रे वाळवल्यावर लक्षात आलं. सुमारे ३० ते ७०० अंश सेल्सियस तापमानाचा या लेपांवर काय परिणाम होतो हे ही तपासलं गेलं साधारणपणे २०० अंश सेल्सियस

तापमानापर्यंत त्या लेपावर कसलाच परिणाम झाला नाही. नंतर मात्र त्याचा दर्जा घसरला, त्यातही PU-T चा लेप PU-M लेपाच्या तुलनेत चांगला प्रतिकार करत असल्याचं आढळून आलं. लेपांच्या या परीक्षेत मोहाच्या तेलापासून बनवलेले पॉलियुरेथेन्स एक उत्तम पर्याय होऊ शकतो असं लक्षात आलं आहे. पॉलियुरेथेन पासून फोम्सही बनवले जातात हे वर नमूद केलं आहेच. यापासून बनवलेल्या गाद्या–उशा कापसाला पर्याय आहेत तर याचाच आणखी एक कडक प्रकार अस्तित्वात आहे हा वजनाला अतिशय हलका, तापमान रोधक, हादरे रोधक, आवाजाची पातळी कमी करण्यासाठी उपयुक्त असा पदार्थ म्हणून मान्यता पावला आहे. या संशोधकांनी असे कडक फोम्स क्लोरेल्ला नावाच्या शेवाळापासून काढलेल्या तेलापासून बनवण्यातही यश मिळवलं आहे. पॉलियूरेथेन बनवण्यात अखाद्य तेलाचा वापर अद्याप बाल्यावस्थेत आहे पण हे आणि अशा प्रकारचे संशोधन त्याची नांदी ठरावी.



वाचकांचा पत्रव्यवहार

# राज्यघटना घडवून नेमके काय साधले गेले!

बाबूराव चंदावार
सईनगर २, डी. १
फ्लॅट-१३, सिंहगडरोड
पुणे ४११ ०३० महाराष्ट्र
दुरध्वनी - ०२०-२४५०६९३

श्री. संपादक,
नवभारत मासिक यांस,
स. न. वि. वि.

"वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत'ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे", असे 'नवभारता'च्या संपादक मंडळाच्या वतीने केलेल्या 'आवाहन'मध्ये म्हटले आहे. हे लक्षात घेऊनच डिसेंबर २०१५ च्या 'नवभारत' अंकात प्रसिद्ध झालेल्या 'प्रासंगिक' सदरातल्या 'भारतीय राज्यघटना' या 'तारतम्य' लेखकाच्या लेखावर मला मतप्रदर्शन करावेसे वाटले आहे.

'भारतीय घटनेने रचनाकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या शतकोत्तर रौप्य महोत्सवी जयंती' चे निमित्त साधून भारतीय संसदेचे दोन दिवसांचे खास अधिवेशन भरविण्यात आले. यात सर्वपक्षीय खासदारांनी केलेल्या भाषणांपैकी काही भाषणे मी दूरदर्शनवर थेट प्रसारणातून ऐकली आहेत. पण, यातून भारतीय राज्यघटनेचे स्वरूप उलगडून दाखवले गेले असावे, असे मात्र वाटले नाही. अर्थातच भारतीय राज्यघटनेच्या संदर्भात 'डॉ. आंबेडकरांच्या माहात्म्याचा गौरव' करण्याचा हेतू 'तारतम्य' लेखकाने प्रारंभालाच विशद करून सांगितला असल्यामुळे भारतीय राज्यघटनेच्या वस्तुस्थितिजन्य स्वरूपाविषयी चिकित्सकपणे विचार करण्याची गरज नसावी, असेच काहीसे मानले गेले असावे, असे मला वाटले. तरीही भारतीय राज्यघटनेची निर्मिती करताना भारतीय स्वातंत्र्य प्राप्त करण्याच्या हेतूनेच केल्या गेलेल्या चळवळींची उद्दिष्टे राज्यघटनेत प्रतिबिंबित झाली आहेत किंवा काय, असा एक प्रश्न उपस्थित होतोच!

समाजवादी मित्र (स्व.) ग. प्र. प्रधान संपादक असताना 'साधना' साप्ताहिकात माझा एक लेख प्रसिद्ध झाला होता. लेखाच्या शीर्षकावर प्रा. प्रधानांनी सोयीचे संपादकीय संस्कार करूनच तो लेख प्रसिद्ध केला होता. "स्वातंत्र्य चळवळीत महात्मा गांधींनी जी भूमिका घेतली होती, ती भारतीय राज्यघटनेत प्रतिबिंबित झाली नाही", असा आशय या लेखाचा होता. याचे समर्थन तपोवन अमरावतीचे कुष्ठसेवक (स्व.) डॉ. दाजीसाहेब शिवाजीराव पटवर्धन यांनी 'साधना' साप्ताहिकाला पत्र लिहून केले होते. माझा लेख वाचून (स्व.) आचार्य दादा धर्माधिकारी यांनी माझ्या काही मित्रांजवळ स्वतःचे मतप्रदर्शन केले होते. याच संदर्भात दादांचे सुपुत्र न्यायमूर्ती चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या मुंबई निवासस्थानी माझी दादांशी सविस्तर चर्चा झाली होती. आचार्य दादा धर्माधिकारी भारतीय संविधान सभेचे मध्यप्रदेश राज्यातून नियुक्त केले गेलेले सन्माननीय सभासद होते. त्यांचा अधिकार मला मान्यच होता. तरीही माझ्याशी चर्चा करताना महात्मा गांधींची विचारसरणी भारतीय राज्यघटनेने स्वीकारली नाही, हे माझे म्हणजे त्यांनी मान्य केले होते. पण, राज्यघटनेच्या निर्मितीला महात्या गांधींनी अनुकूलता दर्शवली व मान्यता प्रदान केली होती, असेही दादांनी मला सांगितले होते. अर्थात, मी हे मान्य केलेच होते!








घटना समितीच्या प्रमुखपदी डॉ. आंबेडकरांना नेमले जावे, याची सूचना स्वतः महात्मा गांधींनींच केली होती व हे सर्वविदित आहे. याचा उल्लेख बिहारचे समाजवादी (लोहियावादी) खासदार श्री. शरद यादव यांनी त्यांच्या राज्यसभेतल्या भाषणात केलाच होता. अर्थात, महात्मा गांधींच्या मान्यतेतूनच डॉ. आंबेडकरांची घटना समितीच्या प्रमुखपदी नेमणूक झाली, हे स्पष्टच आहे. तरीही डॉ. आंबेडकर महत्मा गांधींच्या विचारसरणीला मानणारे नव्हते, हेदेखील स्पष्टच आहे! याच संदर्भात महत्मा गांधींना अभिप्रेत असलेल्या स्वातंत्र्याच्या चळवळीत डॉ. आंबेडकरांचा प्रत्यक्ष सहभाग नव्हता, हे लक्षात घ्यायला हवे. अर्थात, डॉ. आंबेडकर यांना स्वतःची स्वातंत्र्याच्या संदर्भातली चळवळीची पार्श्वभूमी नव्हती व ते महात्मा गांधींच्या स्वातंत्र्याच्या चळवळीशी सहमतही नव्हते. यामुळेच भारतीय स्वातंत्र्याच्या भूमिकेशी अनुकूल अशी भारताची राज्यघटना घडवून आणणे त्यांना व घटना समितीला शक्य झाले नसल्यास ते स्वाभाविकच म्हणायला हवे! पण, डॉ. आंबेडकरांना मानणाऱ्यांना तसेच 'आंबेडकरी चळवळीत'ल्या कोणालाही हे महत्त्वाचे वाटले नव्हते.

लेखक 'तारतम्य' यांच्या म्हणण्यानुसार २६ नोव्हेंबर १९४९ या दिवशी घटनेवरील चर्चेला उत्तर देताना डॉ. आंबेडकरांनी मोठे विस्तृत भाषण केले. यात त्यांनी 'तीन पथ्ये' सांगितली आहेत.

१. क्रांतीचे हिंसात्मक मार्ग कटाक्षाने टाळले पाहिजेत....आपण कायदेभंग व सत्याग्रह या मार्गांचा त्याग केला पाहिजे.

२. कोणत्याही मोठ्या माणसाच्या चरणी आपले स्वातंत्र्य अर्पण न करणे. राजकारणातील भक्ती किंवा विभूतिपूजा हा अधोगतीचा व अंती हुकूमशाहीचा निश्चित मार्ग आहे. (म्हणून तो टाळावा)

३. राजकीय लोकशाहीचा पाया जर सामाजिक लोकशाहीने भरला नसेल, तर ती टिकू शकणार नाही.

डॉ. आंबेडकरांची तीनही पथ्ये मान्य करण्यासाठी त्यांनी जो लोकशाहीचा अर्थ विशद करून सांगितला होता, त्यांत त्यांनी स्वातंत्र्य, समता व बंधुता ही तत्त्वे अंतर्भूत केलेली आहेत. अर्थातच ही तत्त्वे कोणाही स्वातंत्र्यप्रेमीला मान्य करता येण्यासारखीच म्हणताही येतील. पण, भारतीय राज्यघटनेचे स्वरूप या दृष्टीने प्रेरणादायी ठरविता येईल किंवा आलेच आहे, असे म्हणण्यासारखी परिस्थिती आहे काय, यावरही विचार करायला हवा! भारतीय राज्यघटनेनुसार गेली पासष्ट वर्षे जो लोकशाहीचा राज्यकारभार चालविला गेला आहे, त्यावर विचार करताना लक्षात येते की, परिस्थिती निराशाजनकच आहे. म्हणून, राज्यघटनेचे मूल्य व महत्त्व मान्य करूनही जर परिस्थिती निराशाजनकच राहिलेली असेल, तर त्याची कारणे शोधून त्यांवर योग्य ती उपाययोजना करायला हवी. पण, या दृष्टीने डॉ. आंबेडकरांनी जी पथ्ये सांगितली आहेत, ती अमलात आणायची कशी, असा प्रश्न उपस्थित होतोच! म्हणूनच स्वातंत्र्याच्या चळवळीत जी उद्दिष्टे स्पष्ट केली गेली होती, तीच राज्यघटना घडवताना स्वीकारली गेली नसतील व स्वीकारली जातच नसतील तर राज्यघटना घडवून नेमके काय साधले गेले, असाही एक प्रश्न उपस्थित होतोच! नेमका हाच प्रश्न उपस्थित करणाऱ्या नक्सली, माओवादींसारख्या अतिरेकी म्हणवल्या गेलेल्या चळवळी निर्माण होऊ शकल्या आहेत, हे लक्षात घ्यायला हवे! अशा चळवळींतली हिंसा अमान्य करूनदेखील संसदीय लोकशाहीचा पुरस्कार करूनच कायदा आणि सुव्यवस्थेचा प्रश्न समर्थपणे हाताळता येत नाहीये आहे, हेच पदोपदी अनुभवाला येत आहे! अशा वेळी महात्मा गांधींनी स्वीकारलेल्या व अनुसरलेल्या सत्याग्रही-तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणेच अनिवार्य होत नाही काय? यावर राजकारणाच्या पातळीवर विचार करणारे व फक्त राजकारणच करणारे कोणताच प्रभावी पर्याय देऊ शकत नाहीत, हेच सदोदित अनुभवाला येत आहे!

डॉ. आंबेडकर हे एक अग्रणी समाजसुधारक म्हणून जरी परिचित असले, तरी ते राजकारणातही होते हे मान्यच करायला हवे. समाजसुधारणा आणि राजकारण या दोन्हींचा सुमेळ साधणे अद्यापही शक्य झालेले नाही, कदाचित ते शक्य होणारही नाही. म्हणूनच डॉ. आंबेडकरांनी बुद्ध धर्माचा स्वीकार केल्यानंतर राजकारणाचे प्रयोजन उरलेच नाही, असे त्यांनी मानले असणार, असाच एक समज माझ्यासारख्या अनेकांचा झालेला होता. पण, स्वतः डॉ. आंबेडकर व ांचे अनुयायी राजकारणापासून मुक्त होऊच शकले नाहीत, हीच एक वस्तुस्थिती शिल्लक उरलेली आहे! राजकीय

स्वातंत्र्य प्राप्त करण्याचा हेतू साध्य केल्यानंतर काँग्रेस पक्षाचे विसर्जन केले जावे, हे महात्मा गांधींनी त्यांच्या शेवटच्या मृत्युपत्रात नमूद करून ठेवले आहे. अर्थात, काँग्रेस 'लोकसेवक' संघात परिवर्तित केली जावी, असेही त्यांनी नमूद करून ठेवलेले आहे. काँग्रेस पक्षाने हे मान्य केले असते, तर आजची परिस्थिती काही वेगळीच राहू शकली असती! महात्मा गांधींच्या सत्याग्रही-तत्त्वज्ञानाला मानणारे त्यांचे बहुतेक सर्वच सहकारी प्रत्यक्ष राजकारणातून मुक्तच राहू शकले. अशांचे नेतृत्त्व (स्व.) विनोबा भावे व (स्व.) जयप्रकाश नारायण या दोघांनी केले, व हे जगात सर्वत्र जाणलेही गेले आहे!

लुम्बिनीचा राजपुत्र गौतमाने राज्यत्याग केला व त्यामुळे तो ज्ञान प्राप्त करू शकला, म्हणून तो 'बुद्ध' होऊ शकला होता. सम्राट अशोकानेही राज्याचा त्याग करूनच बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता. डॉ. आंबेडकरांना हे सर्व ज्ञात होतेच. तरीही राजकारणाच्या त्यागाची भूमिका त्यांनी स्वीकारली नव्हती. म्हणून बौद्धधर्मीय समाजही राजकारणाचा त्याग करू शकलेला नाही, ही वस्तुस्थिती शिल्लक उरलेलीच आहे! तेव्हा, या सर्वच बाबतीत विचार करताना लक्षात येते ते असे. डॉ. आंबेडकरांनी महात्मा गांधींच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाकडे नेमके कोणत्या दृष्टीने पाहिले असेल, हे फारसे लक्षातच येत नाही! म्हणून, स्वातंत्र्याच्या चळवळीत सहभागी नसण्याची त्यांनी मानलेली जी काही कारणे असू शकतील किंवा असतील, तीही लक्षात येत नाहीत!

अशाच एका वेगळ्या संदर्भात माझे हिंदी भाषेतले एकशेबासष्ट पृष्ठसंस्थेचे 'सत्याग्रह और संसदीय लोकतंत्र' हे पुस्तक (प्रथमसंस्करण २०१५) दिल्लीच्या शरारे प्रकाशनाने एक महिन्यापूर्वीच नोव्हेंबर २०१५ ला प्रसिद्ध केले आहे. यात मी विस्तृतपणे विवेचन केलेले असल्यामुळे ते अभ्यासकांनी लक्षात घ्यावे, हे अपेक्षित आहे!

('सत्याग्रह और संसदीय लोकतंत्र'
शरारे प्रकाशन बी-बी/ ६ बी, जनकपुरी
नई दिल्ली ११० ०५८, मूल्य रु.३८०/-
ईमेल shrareprakashan@gmail.com )

---

## लेखकांचा परिचय

 **डॉ. माधवी देसाई**

शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागात प्राध्यापिका. ग्रेस यांची कविता : स्वरूप शोध (संध्याकाळच्या कविता आणि चंद्रमाधवीचे प्रदेश या कवितासंग्रहांच्या अनुषंगाने या विषयावर एम. फिल. पदवी). पु. शि. रेगे आणि ग्रेस यांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा या विषयावरील शोधप्रबंध पीएच. डी.साठी सादर. विविध नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.

***पत्ता :–*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली - ४१६४१६.

भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६.

 **गणेश उमाकांत थिटे**

सेवानिवृत्त संस्कृत विभाग प्रमुख , प्राध्यापक संस्कृत विभाग , सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ..

***पत्ता :*** २१, एरंडवणा, गावठाण, मेहेंदळे गॅरेज जवळ, पुणे-४११ ००४ मो. ९८२२९१२०८१.

 **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.

दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

 **हरगोविंद म. होले.**

माजी प्राचार्य श्रीकृष्ण हायस्कूल व ज्युनियर कॉलेज आमला, जिल्हा अमरावती.

***पत्ता :–*** आमला, विश्वेश्वर चांदुर रेल्वेस्टेशन अमरावती. पि. ४४४ ९०४. भ्रमणध्वनी : ९५६१७२९३९९

 **व. भ. कर्णिक**

कामगार पुढारी. एम. एन. रॉय पक्षाचे सभासद.

 **मुरारी तपस्वी**

नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ ओशन ग्राफी मध्ये मुख्य ग्रंथपाल होते. निवृत्त झाल्यावर गोवा विद्यापीठात कुलगूरूचे स्वीय सहाय्यक आहेत. विज्ञानावर ते लेखन करतात.

***पत्ता :*** ४, सिंगबाल बिल्डिंग, टोक पो. ऑ. करंझाळे, गोवा- ४०३ ००२. मो. ९७६३३४१९६७.

 **श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट-१३, सिंहगडरोड, पुणे-४११ ०३० दूरध्वनी :०२०-२४२५०६९३ .

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारत'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारत' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ४००/- असून वर्गणी. चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*– संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई